: -विवेचन-माला : : : पुष्प ४ थें

# अ रा ज्य वा द

लेखक

पां. वा. गाडगीळ,

वाङ्मय-विशारद

ऱ्हेंबर,
९३९

किंमत ८ आणे

# प्रस्तावना

अलेक्झांडर बर्कमन्चें 'व्हॉट् इज् कम्युनिस्ट अनार्किझम्', प्रिन्स क्रोपॉट्किन्चें 'कॉंक्वेस्ट ऑफ् ब्रेड', क्रोपॉट्किन व टॉलस्टॉय यांचे निबंध-संग्रह, श्री. जावडेकर यांचें 'राजनीतिशास्त्रप्रवेश' इत्यादि ग्रंथांच्या आधारें हें पुस्तक लिहिलें आहे. वादविवेचन-मालेचा उद्देश प्रत्येक पुस्तकाच्या विषयाची मूळ भूमिका निःपक्षपातीपणानें समजून देणें हा आहे हें लक्षांत ठेवूनच आज-वरच्या पुस्तकांप्रमाणें हेंही पुस्तक लिहिलें आहे.

सगळ्या जगांतल्या अनेक विचारसरणींपैकीं अत्यंत उपेक्षिलेली अशी 'अराज्यवाद' ही विचारसरणी आहे. हिच्याविरुद्ध घेण्यांत येणारे आक्षेप जसे सहज सुचणारे व सहज पटणारे आहेत तितका सोपेपणा मूळ विचार-सरणींत आहेसें वाटत नाहीं. समाजाची मनोभूमिका या विचारसरणीविरुद्ध अतिशय दृढतेनें पूर्वग्रहदूषित असते. सैन्य–आरमार, पोलीस व न्यायकचेरी हीं नाहींशीं होतील तेव्हांच समाज निरोगी, सुखी व सुसंस्कृत होईल हें म्हणणें आज कोणी ऐकून घेण्यासही तयार होत नाहीं, मग समजून घेण्याचें तर लांबच राहिलें. वाचकांच्या मनोभूमिकेच्या या प्रतिकूलतेमुळेंच हा विषय अवघड वाटतो व उपेक्षिला गेला आहे.

पण मानव-समाजासंबंधानें अत्यंत मूलग्राही अशी ही विचारसरणी असून मानव-समाजाकडे कोणत्या दृष्टीनें पाहिलें पाहिजे हें सर्व निरनिराळ्या विचारसरणींच्या पुरस्कर्त्यांनाही अराज्यवाद्यांपासून शिकण्यासारखें आहे.

पां. वा. गाडगीळ

## अनुक्रमणिका



---

# अराज्यवाद

## उपोद्घात : : : १

'अराज्यवाद' हा इंग्रजींतील 'अनार्किझम्' या शब्दास मराठी प्रतिशब्द म्हणून येथें योजलेला आहे. 'शासनाभाववाद' असा एक प्रतिशब्द यापूर्वी योजण्यांत आलेला आहे व तो मूळच्या इंग्रजी शब्दाचा अर्थ बिनचूकपणें व्यक्त करतो. पण तो शब्द सुटसुटीत नाहीं. 'अराजकवाद' हाही शब्द या अर्थानें पुष्कळदां वापरण्यांत येतो. पण 'अराजक' या शब्दाचा अर्थ बेबंदशाही, बंडाळी, अत्याचारयुक्त अव्यवस्था असाच लोकांत बराच रूढ असल्यानें 'अनार्किझम्' हें एका सुव्यस्थित, शांतताप्रधान समाजव्यवस्थेचें नांव आहे हें एकदम कोणाच्या लक्षांत येत नाहीं. वरील कारणां-साठीं 'अनार्किझम्' या इंग्रजी शब्दास 'अराज्यवाद' हा सुटसुटीत व मूलार्थ बिनचूकपणें व्यक्त करणारा शब्द येथें योजला आहे.

### ही बेबंदशाही नव्हे

'अराज्यवाद' म्हणजे, जींत राज्यसंस्था नाहींच अशी समाज-सुव्यवस्था निर्माण करावी व तशी ती निर्माण करणें शक्य आहे असें मानणारा मत-पंथ. या पंथाचें म्हणणें आजवर जगांत कोणीं फारसें विचारणीय मानलेलें नाहीं अथवा धडपणें ऐकूनही घेतलेलें नाहीं. राज्यसंस्थेचा अभाव म्हटलें कीं, लूटमार, खून, बेबंदशाही व सर्व

प्रकारचे नैतिक अत्याचार ओघानेंच आले असेंच जो तो मानतो. जगांतील राज्यसंस्थांचे शत्रु व क्रांतिकारकांचे शिरोमणि असे जे कम्युनिस्ट त्यांना अराज्यवाद हा ध्येय म्हणून मान्य असला तरी तशी समाजव्यवस्था कधीं स्थापन होईल हें त्यांच्या अजून दृष्टिपथांतही येत नाहीं. दरम्यान किती तरी मोठा कालपर्यंत कामगारराज्य स्थापलें पाहिजे असें ते मानतातच. आजच किंवा नजीकच्या भविष्यकाळांत राज्यसंस्था अजीबात नष्ट केली तर बेबंदशाही माजेल अशी कम्युनिस्टांनाही भीति वाटते. पण अराज्यवाद्यांच्या मतें कोणतीही राज्यसंस्था—मग तें कामगारराज्य का असेना—अन्याय व जुलूम करणारी संस्था होय. कोणतीही राज्यसंस्था जगांत राहूं न देण्यानेंच खरी शांतता व सुव्यवस्था निर्माण होईल. कम्युनिस्टांच्या मतें, कामगारराज्यानें समाजाची कित्येक वर्षें योग्य प्रकारें तयारी केल्यावर मगच अराज्यव्यवस्था निर्माण होऊं शकेल. उलट " अराज्यवाद स्थापण्यासाठीं माणसांना कोणतेही नवे पंख उत्पन्न करण्याची जरूरी नाहीं, आज जगांत आहेत हींच माणसें याच परिस्थितींत अराज्यव्यवस्था निर्माण करूं शकतील" असें अराज्य-वादाचा पुरस्कर्ता अलेक्झँडर बर्कमन ठासून सांगतो.

अराज्यवादाबद्दल सर्वत्र जो अनेक प्रकारचा गैरसमज आहे व जी भीति वावरत असते तिचें निराकरण करण्यासाठीं बर्कमन लिहितो:—"अराज्यवाद म्हणजे बॉम्ब, अव्यवस्था अथवा गोंधळ नव्हे; अथवा चोरी, खून, साऱ्या जगाशीं युद्ध, रानटीपणा असें कांहींही नव्हे. याच्या अगदीं विरुद्ध अशी सुव्यवस्था अराज्यवादानें निर्माण होईल. अराज्यवाद मागतो कीं— तुम्ही स्वतंत्र झालें पाहिजे; कुणीही तुम्हांला गुलाम करूं नये, तुमच्यावर दादागिरी गाजवूं नये, तुम्हांला लुटूं नये, तुमच्यावर सक्ती करूं नये, तुम्हांला हवें तें

करण्याची व नको तें न करण्याची मुभा असावी, तुम्हांला हवें तसें जगतां यावें, त्याला कोणाचाही अडथळा येवूं नये, तुमच्याखेरीज इतरांनाही तुम्हांसारखेंच हें सर्व स्वातंत्र्य असावें, सर्वांचे हक्क आणि सर्वांचें स्वातंत्र्य सारखेंच असावें, सर्वांत बंधुभाव नांदावा आणि सर्वांनीं सौजन्यानें, सलोख्यानें आणि शांततेनें नांदावें; युद्ध, अत्याचार, मक्तेदारी, जुलूम असलें कांहींही नसावें; थोडक्यांत म्हणजे सर्व स्त्री-पुरुष स्वतंत्र व समजूतदारपणें सामाजिक जीवनाचा सारखाच आनंद ज्या योगें उपभोगतील तो अराज्यवाद होय."

## राज्यसंस्थेचें वैशिष्ट्य

पण अराज्यवाद्यांचें हें सुखस्वप्न सत्यसृष्टींत कधींकाळीं अवतरूं शकेल हें अद्याप कोणालाच पटत नाहीं. राज्यसंस्थेच्या अस्तित्वाची आपणाला इतकी सवय अथवा खोड जडली आहे कीं, तीवांचून मानवी जीवन कसेंबसेंही चालूं शकेल हें खरें वाटतच नाहीं. जिवंत शरीरांत प्राण जसा रोमरोमीं भरलेला असतो अथवा आपल्या भोंवतालच्या अवकाशांत अणूरेणूएवढीही जागा जशी हवेनें व्यापलेली असते त्याप्रमाणें आपल्या जीवनाचीं सर्वांगें राज्यसंस्थेनें व्यापलीं आहेत. राज्यसंस्थेचा हा व्याप दिवसानुदिवस अधिकाधिक दृढ होत आहे आणि माणसांना असें होत जाणें हेंच अवश्य वाटत आहे. प्रत्येक व्यक्तीनें अमुक असें वागावें (विधि) आणि अमुक तसें वागूं नये(निषेध) असें 'विधि-निषेधात्मक' नियंत्रण राज्यसंस्थेकडून समाजाचें होत असतें. उदाहरणार्थ रस्त्याच्या डाव्या बाजूनें वाहनें चालवावीं ( विधि ) उजव्या बाजूनें चालवूं नयेत ( निषेध ), एका व्यक्तीनें दुसऱ्या व्यक्तीशीं केलेला करार पाळावा ( विधि ), एका व्यक्तीनें दुसऱ्या व्यक्तीच्या शरीरास अथवा मालमत्तेस इजा करूं नये ( निषेध ), वगैरे विधि-

निषेध राज्यसंस्थेकडून समाजावर सक्तीनें लादण्यांत येत असून त्यांचें उल्लंघन करणारास राज्यसंस्था शासन करूं शकते. कोणत्याही एखाद्या सार्वजनिक संस्थेचा सदस्य असणें व राज्यसंस्थेचा सदस्य म्हणजे नागरिक असणें यांत मूलतःच फरक आहे. सर्वसामान्य सार्वजनिक संस्थांचे सदस्य असणें ही ऐच्छिक बाब आहे. एखादें वाचनालय, सहकारी पतपेढी, शिक्षणसंस्था वगैरेचे सदस्य होणें अथवा न होणें ही ज्याच्या त्याच्या इच्छेची बाब असते. जे या संस्थांचे सदस्य असतील त्यांनाच या संस्थांचीं विधिनिषेधात्मक बंधनें बंधनकारक होऊं शकतात; पण राज्यसंस्थेचें असें नाहीं. राज्यसंस्था विशिष्ट भौगोलिक क्षेत्रास व्यापून राहते. त्या त्या क्षेत्रांत जन्मास आलेली प्रत्येक स्त्री-पुरुष व्यक्ति, इतकेंच नव्हे तर स्थावर व जंगम मालमत्ता यावर राज्यसंस्थेचें विधिनिषेधात्मक नियंत्रण चालतें.

व्यक्तिमात्राची इच्छा असो वा नसो, राज्यसंस्थेचें सदस्यत्व, म्हणजेच नागरिकत्व हें व्यक्तिमात्रावर जन्मास आल्यापासूनच लादलेलें असतें. राज्यसंस्थेचा हा व्याप व हें बंधन पदोपदीं व्यक्तिमात्राच्या प्रत्ययास येत असतें. आपण राहतों तीं घरें, सार्वजनिक रस्ते व वाहनें, आपणांस शिक्षण देणाऱ्या शिक्षणसंस्था, प्रसिद्ध होणारीं पुस्तकें व वृत्तपत्रें, नाटकें, सिनेमा वगैरे करमणुकीचीं साधनें, रोगनिवारणाचीं औषधें व दवाखाने, फार काय, गांजा, अफू, दारू वगैरे व्यसनें यांवरही राज्यसंस्थेचें नियंत्रण आहेच. कोठें तें कमी तर दुसऱ्या कोठें तें अधिक असेल. हें नियंत्रण वाढतें असावें अशीच लोकमताची मागणी आहे जीवन जितकें अधिक सुधारतें आहे तितकें तें राज्यसंस्थेच्या हातीं जाण्याबद्दल लोकांची मागणी वाढतें आहे. बैलगाडी ही ज्याचा तो खेडचापाडचांतून कशीही वापरीत असतो. पण मोटार वापरण्यास सरकारचा परवाना लागतो. सरकारकडून

मोटारची तपासणी होते व ती चालविणारास त्यासंबंधानें सरकारनें केलेले नियम पाळावे लागतात. मोटारीवर सरकारचें असें नियंत्रण असणें इष्ट आहे असेंच लोकमत आहे. याचप्रमाणें शिक्षण, आरोग्य, रोजगारी व सुखसोयींची वाढ या सर्व बाबतींत सरकारनें अधिक लक्ष घालून व अधिक सत्ता गाजवून वैयक्तिक जीवनास मदत केली तरच वैयक्तिक व सामाजिक जीवन सुखी आणि समृद्ध होईल असें लोकमत बनलेलें आहे. तेव्हां मानवी जीवन सुखी व समृद्ध होण्यास राज्यसंस्थाच नष्ट केली पाहिजे हें अराज्यवाद्यांचें मत कोणास कसें पटणार? मानवी जीवनाच्या सर्व संकटांस राज्यसंस्थाच कारण आहे हें कोणाच्या कसें लक्षांत येणार?

---

## राज्यसंस्था हीच अनर्थाचें मूळ : : : २

### मानवी जीवनाचें पृथक्करण

'खरोखर राज्यसंस्था हीच समाजांतील सर्व अनर्थांस कारण आहे' हें अराज्यवाद्यांचें म्हणणें समजून घेण्यासाठीं आपल्या जीवनाचें थोडेंसें पृथक्करण करूं. मानवजातीचें अंतिम ध्येय काय, हें शोधून काढण्यासाठीं जगांतील तत्त्वज्ञांनीं आजवर डोंगराएवढी रद्दी लिहून काढली असेल. पण त्या ध्येयाचा शोध अजून कोणासच लागल्याचें दिसत नाहीं. उलट, सामान्य माणसास या शोधाची गरज असेल असेंही वाटत नाहीं. आपणाला काय हवें याची सामान्यतः सर्व समंजस माणसांना जाणीव असते. आपण समर्थ व निरोगी

असावें अशी सर्वांची इच्छा आहे. सर्वांना अन्न, वस्त्र व आश्रय हें सर्व चांगलें व पुरेसें हवें असतें. आपल्याभोंवतींही अशींच सुखी माणसें असावीं असें प्रत्येकास वाटत असतें. आणि प्रत्येकास आपल्या मनाप्रमाणें वागण्याचें स्वातंत्र्य हवें असतें. या सर्वांची प्राप्ति करून घेण्यासाठीं माणसाला यत्न करावा लागतो. केवळ व्यक्तिमात्राच्या प्रयत्नानेंच त्यास वरील प्रकारच्या सुखसोयी प्राप्त होत नसून अनेक व्यक्तींच्या प्रयत्नांचा परस्पर-विनिमय आणि सहकार्य होऊनच व्यक्तिमात्रास आपल्या सुखसोईची प्राप्ति करून घेतां येते. उदाहरणार्थ, शेतकरी धान्य पिकवितो तें कांहीं स्वतांपुरतेंच पिकवीत नाहीं, सर्व समाजासाठीं पिकवितो; आणि तें धान्य समाजांतील सुतार, लोहार, चांभार, शिंपी, न्हावी, तेली, कोळी, भटजी, शेठजी या सर्वांस देऊन त्या त्या समाजघटकांकडून शेतकरी सेवा घेत असतो. असेंच वर सांगितलेला प्रत्येक समाज-घटक करीत असतो आणि अशा प्रकारें परस्पर-सेवेनें म्हणजेच वैयक्तिक प्रयत्नांच्या विनिमयानें व सहकार्यानेंच समाज चालत असतो. अशा सामुदायिक म्हणजे सामाजिक जीवनांतच व्यक्तीचें सुख सिद्ध होत असतें. अशा दृष्टीनें पाहिलें तर समाजांतील सर्व व्यक्तींचे हितसंबंध परस्परानुकूल असणें स्वाभाविक नव्हे का? प्रत्येकालाच अन्न, वस्त्र, आश्रय, आरोग्य, स्वातंत्र्य वगैरे हवें असेल आणि व्यक्तीव्यक्तींच्या प्रयत्नांचा विनिमय व सहकार्य होऊनच तें सर्व मिळणार असेल तर सर्वच व्यक्तींचें सुख व हित परस्परावलंबी व म्हणून परस्परानुकूल असण्यास हरकत काय? आणि मग जगांतील सर्व माणसांनीं परस्परांशीं स्नेहानें, बंधुभावानें राहण्यास काय हरकत आहे?

### मग हा अन्याय कां?

पण माणसांचें हें जग असें बंधुभावानें नांदतेंसें दिसत नाहीं.

'कलह आणि युद्धें, दुःख, अन्याय आणि गुन्हे, दारिद्र्य आणि जुलूम' यांचा जिकडे तिकडे प्रत्यय येत आहे. असें कां? याचें कारण प्रत्येकाचे वैयक्तिक 'स्वार्थ' भिन्नभिन्न व परस्परविरोधी आहेत असें सांगण्यांत येतें. कसें तें पहा. मला एखादी टोपी किंवा जोडा घ्यायचा आहे. मी दुकानांत जातों आणि मला हव्या असणाऱ्या मालाची किंमत विचारतों. दुकानदाराची इच्छा तो माल जास्तींत जास्त किंमतीस विकून जास्तींत जास्त नफा मिळवावा अशी असते आणि मला तो माल कमींत कमी किंमतीस मिळावा अशी मला इच्छा असते. एकाला जें नुकसानीचें वाटतें तें दुसऱ्याला फायद्याचें वाटतें. आणि प्रत्येकजण दुसऱ्याचें नुकसान झालें तरी आपणास फायदा मिळावा अशी इच्छा करीत असल्यामुळें मी व दुकानदार यांमध्यें चुरस अथवा विरोधीभाव उत्पन्न होत असतो. मी व दुकानदार या दोन व्यक्तींत जो हा हितविरोध दिसून येत आहे तें सर्वच समाजाचें आजचें स्वरूप आहे. भांडवलदार हे नफा मिळविण्यासाठीं आपसांत चढाओढ करतात. मजूर मजुरी मिळविण्यासाठीं आपसांत चढाओढ करतात. मजुरांची पिळणूक भरपूर करून भांडवलावर नफा खूप उरावा म्हणून भांडवलदार आपसांत एकजूट करून मजुरांना अडवितात. उलट मजूरही आपसांत संघटना करून भांडवलदारांना अडवितात. शेतकरी व जमीन-मालक यांमध्येंही असाच अडवाअडवीचा लढा चाललेला असतो. हा लढा चालतो त्यांत एक पक्ष बली व दुसरा दुर्बल असतो आणि यामुळें एक पक्ष जास्तींत जास्त नफा मिळवून गबर झालेला आढळतो तर दुसरा दारिद्र्याच्या चिखलांत रुतलेला असतो. जगाकडे नजर टाकली तर सर्वत्र असें दिसून येईल कीं गरीबांची संख्या अगदीं अफाट असून अगदीं अन्नान्नदशा होऊन किड्यामुंग्यांप्रमाणें मरणारे

कोट्यवधि लोक जगांत आहेत. आणि धनिकांची संख्या त्या मानानें अगदींच थोडी आहे. कोटयवधि लोकांना ज्या अन्नवस्त्रा-वांचून व घरादारावांचून मरावें लागतें तें अन्नवस्त्र व तीं घरेंदारें अगदीं थोड्या लोकांच्या हातीं आहेत. त्यांना त्यांचा उपभोग घेऊन तीं संपवितांही येत नाहींत. तरी पण तीं त्यांच्याच मालकींत ठेवण्यांत येतात. असें कां व्हावें ? वास्तविक व्यक्तीला व समाजाला लागणाऱ्या ज्या उपयुक्त वस्तु आहेत, त्या एक तर नैसर्गिक म्हणून सर्वांना विनाश्रम मिळाव्या अथवा माणसाच्या श्रमानें निर्माण व्हाव्या व त्या सर्व श्रम करणाऱ्यांना ( आणि त्यांच्यावर अवलंबून असणाऱ्या नातलगांना वगैरे ) मिळाव्या. धान्य अथवा फळें, कापड अथवा घरें, आगगाड्या आणि मोटारी वगैरे लोकोपयोगी वस्तु निसर्गाची देणगी व त्यास मिळालेली मानवी श्रमाची जोड यांपासून उपलब्ध झाल्या आहेत. अर्थात् श्रम करणाऱ्या जगांतील प्रचंड लोकसंख्येला या वस्तूंचा पुरेसा उपभोग मिळणें हा त्या सर्व वस्तूंवर पहिला बोजा असला पाहिजे. पण जगांतील दृश्य पाहिलें तर निस-र्गानें दिलेल्या व माणसाच्या श्रमानें निर्माण झालेल्या जगांतल्या वस्तु अगदीं थोड्या धनिकांच्या कोठारांत वायां चालल्या असतांही त्यांवांचून उपासमार होणाऱ्या श्रमजीवी वर्गांना त्यांचा उपभोग कां मिळूं नये ? खरोखर हा अन्याय नव्हे का ? राज्य ही संस्था हा अन्याय नाहींसा करण्याचे कामीं कांहीं मदत करते का ? तसें दिसत नाहीं. उलट श्रम करून जगणाऱ्या लोकांनीं उपभोग्य धन आपणांजवळ नाहीं म्हणून श्रीमंतांजवळचें धन त्यांच्या इच्छेविरुद्ध घेतलें तर ही 'चोरी' आहे असें ठरवून या 'चोरां'ना राज्यसंस्था शिक्षा करते. म्हणजे श्रम करणाऱ्यांना धनाचा उपभोग न मिळणें हा अन्याय राज्यसंस्था निवारीत नाहींच. उलट, हा अन्याय

आपल्या हातानें निवारूं पाहणाऱ्यांना 'चोर' म्हणून शिक्षा करते. म्हणजे राज्यसंस्था अन्याय निवारण्यासाठीं नसून अन्याय चालू ठेवण्यासाठींच आहे असें अराज्यवाद्यांचें म्हणणें आहे.

पण यावर तुम्ही आक्षेप घ्याल कीं, "गणूच्या मालकीचा माल गणूच्या मालकींत राहूं देणें आणि गोविंदास गणूच्या संमतीवांचून तो घेऊं न देणें हें राज्यसंस्थेचें कर्तव्य नव्हे का? याचाच अर्थ चोरीस प्रतिबंध करणें हें राज्यसंस्थेचें कर्तव्य नव्हे का? समाजांतील व्यक्तींच्या श्रमांच्या विनिमयानें व श्रमांच्या सहकार्यानेंच भोग्य संपत्ति निर्माण होते. हें सहकार्य व हा विनिमय परस्पर-कराराच्या मार्गानें होऊं शकतो. तदनुसार समाजांत उत्पन्न झालेल्या संपत्तीची वांटणी होते. आणि अशा वांटलेल्या संपत्तीच्या मालकीचें सरकारनें रक्षण केलें तरच श्रम करून संपत्ति निर्माण करण्यास व्यक्तिमात्राला उत्तेजन राहील. हेंच राज्यसंस्था करीत आहे ना? शिवाय, करार कोणत्या अटींवर करावा हें ठरविण्याचें ज्याचें त्याला स्वातंत्र्य आहेच आहे. गोविंदाला गणूस मजुरीस लावावयाचें असेल तर गणू म्हणेल त्या अटींवरच तो त्याला नोकरीस ठेवूं शकेल. गणूची इच्छा असेल तरच तो नोकरी करील, नसेल तर करणार नाहीं. तसेंच आपल्या श्रमाचा पुरेपूर मोबदला मिळणार असेल तरच गोविंदाची नोकरी पत्करावी एरव्हीं पत्करूं नये याचेंही गणूस स्वातंत्र्य आहे. गोविंदा गणूवर कोणतीही सक्ती करूं शकत नाहीं. या व्यक्तिस्वातंत्र्याचें रक्षण सरकार करीत आहे. मग यापलीकडे समाजांत कांहीं गरीब व कांहीं श्रीमंत राहिले तर सरकारवर त्याची कां जबाबदारी टाकली जावी?"

## राज्य'व्यवस्थे'नें केलेली अव्यवस्था

पण या आक्षेपांत गृहीत धरलेलें व्यक्तिस्वातंत्र्य आजच्या

समाजांत शिल्लक आहे का ? राज्यसंस्थेकडून खरोखर व्यक्तिस्वातंत्र्याचें रक्षण होत आहे का ? एक काळ असा होता कीं, प्रत्येक कारागीर स्वतःच मालक व स्वतांच नोकरही होता. त्याचीं हत्यारें त्याच्या मालकीचीं होतीं. त्याचें गिऱ्हाईक व त्याच्या गरजा यांचा त्यास पूर्ण आडाखा होता. त्या वेळीं त्यास पुष्कळसें व्यक्तिस्वातंत्र्य होतें असें म्हणतां येईल. पुढें कारखानदारी उत्पादन सुरू झालें. त्या प्रचंड कारखान्यांत होणाऱ्या स्वस्त मालाशीं चढाओढ करतांना कारागिराचा माल टिकला नाहीं आणि कारागिराचा खाजगी धंदा बुडून तो कारखान्यांत मजूर झाला. आतां मजूर झालेल्या या कारागिराचें व्यक्तिस्वातंत्र्य कितीसें शिल्लक राहिलें आहे ? कारखान-दारानें पुरेशी मजुरी दिली तरच त्यानें त्याची नोकरी करावी, कारखानदार मजुरावर सक्ती करूं शकत नाहीं. पण कारखानदार हा धनिक आहे. मजुरानें नोकरी पत्करली नाहीं व कारखाना त्यामुळें कांहीं काळ बंद राहिला तर तेवढ्यानें कारखानदाराची ताबडतोब उपासमारच होईल असें नाहीं. मजुराची स्थिति मात्र याच्या अगदीं उलट आहे. तो गरीब आहे. ताबडतोब रोजगार धंदा न मिळेल तर त्याजजवळ बाजार करण्यास पैसा नसल्यानें त्याची ताबडतोब उपासमार होईल. कारखानदारानें रोजगार व मजुरी न दिल्यास स्वतंत्रपणें करतां येईल असा धंदा मजुराला उरलेला नाहीं. म्हणून कारखानदाराच्या सक्तीनें नव्हे, पण उपास-मारीच्या भीतीनें मजुराला कारखानदाराची नोकरी तांतडीनें पत्करावीच लागते. आणि तशी ती पत्करतांना आपणाला हवी तेवढी मजुरी मागतां न येऊन कारखानदार देईल तेवढी मजुरी पत्करावी लागते. तींत सगळें पोट न भरलें तरी अर्धें भरेल, अजीबात होणारी उपासमार तरी टळेल एवढेंच समाधान. हें कसलें व्यक्तिस्वातंत्र्य !

उपासमारीच्या 'भीती'नें मला जर कमी पगारावर नोकरी करणें भागच पडलें तर मला व्यक्तिस्वातंत्र्य लाभलें का ? एखाद्या दरोडेखोरानें माझ्या छातीवर पिस्तुल रोखून माझ्या खिशांतील पैसे काढून घेतले अथवा आपली हमाली करण्यास मला भाग पाडलें तर ही चोरी अथवा दरोडा झाला असें हल्लींचें सरकार मानतें व त्या चोरास अथवा बळजोरी करणारास शिक्षा करतें. पण उपासमारीच्या 'भीती'नें मीं जर कमी पगाराची नोकरी पत्करली तर हा माझ्यावर दरोडाच पडला असें नव्हे का ? जितका पगार मला हवा त्याहून जितका कमी पत्करणें मला भाग पडतें तितक्या माझ्या पैशाची ही चोरीच नव्हे का ? कारखानदार ही माझी चोरी व माझ्यावर ही बळजोरी करतो असाच याचा अर्थ नाहीं का ? माझी अशी चोरी व मजवर ही बळजोरी करण्याची शक्यता कारखानदाराला त्या कारखान्याच्या मालकीमुळें आली आणि कारखानदाराची मालकी सरकार संभाळतें तोंवर मजवर चोरी व बळजोरी करण्याची मुभा सरकार कारखानदारास देतें असेंच समजलें पाहिजे. सरकारच्या शक्तीचा पाठिंबा नसता तर कारखानदारास ही गुन्हेगारी अशीच चालू ठेवणें शक्य झालें नसतें.

ही गुन्हेगारी अशीच चालू ठेवण्याचेंच मुख्य कार्य राज्यसंस्था करीत आहे. मजुरावर होणारा हा जुलूम नाहींसा करावयाचा असेल तर राज्यसंस्थेनें पुरेशा मजुरीवर मजुरास रोजगारी पुरवण्याची हमी घेतली पाहिजे. पण कारखानदार व मजूर यांना परस्परांत 'स्वतंत्रपणें' करार करूं देण्याचें स्वातंत्र्य संभाळण्यापलीकडे कोणतीही विशेष जबाबदारी राज्यसंस्था पत्करण्यास तयार नाहीं. मजुरास रोजगारी पुरवण्याची जबाबदारी कांहीं हल्लींचें भांडवलशाही सरकार पत्करीत नाहीं.

ही व्यवस्था कीं अव्यवस्था? या 'व्यवस्थे'नें सगळेंच मानवी जीवन कसें विस्कटलें आहे पहा. पृथ्वी किती सुंदर आणि धनसंपन्न आहे! मनाला आनंद देणारें चकचकीत ऊन्ह अगदीं मोफत मिळतें. माणसानें आपल्या बुद्धिबलानें हवा आणि वीज हीं माणसाच्या लगामीं लावलीं आहेत. तरी पण दुःखभाराखालीं जगांत असंख्य जीवांचा आक्रोश चालूच आहे. तो कां? दारिद्य आणि गुन्हेगारी, रोगराई आणि माथेफिरूपणा, युद्धें आणि कत्तली यांचा जगभर बुजबुजाट कां झालेला असावा? 'ईश्वराची इच्छा' असें धर्मगुरु सांगतो; 'लोकच वाईट आहेत' असें कायदेपंडित म्हणतो; 'अहो, हें असेंच चालायचें' असें तुम्ही आम्ही उथळ माणसें म्हणतों; पण यांतील एक तरी कारण खरें आहे का?

म्हणे 'ईश्वराची इच्छा!' ईश्वर हा न्यायी आहे, दयाळु आहे, सर्वशक्तिमान् आहे असें आपण म्हणतों. तो जगत्पिता, जगन्माता आहे व आपण सर्वजण त्याचीं लेंकरें आहों असें आपण म्हणतों; मग आपणांला आईबापासारखा असणारा, न्यायी व दयाळु आणि सर्वशक्तिमान् असा हा ईश्वर आपल्या कोट्यवधि लेंकरांना दुःखांत अनंत काळपर्यंत कण्हत, कुंथत ठेवील? मूठभर लोकांची चैन चालू ठेवून त्यासाठीं कोट्यवधि लोकांवर अन्याय व जुलूम यांचा वर्षाव चालू राहूं देईल? असें जर असेल तर मग तो ईश्वर कसला? सैतानच तो!

## चोर 'चोर' कां झाला?

पण कायदेपंडित म्हणतो त्याप्रमाणें 'लोकच वाईट आहेत' म्हणून जगांत दुःख आहे असें आपण समजूं. पण लोक तरी वाईट कां झाले असावे? ईश्वरानें त्यांना जन्माला घातलें तेव्हांच ते वाईट

होते असें कांहीं म्हणतां येणार नाहीं. मग ते वाईट कसे, कां व केव्हां झाले हें आपण तपासून पाहूं. आपण कसें जगतों हें पाहिलें कीं या सर्वांचा बोध होईल. " अगदीं लहानपणापासून आम्हांला शिकविलें आहे कीं 'पैसा कमवा.' पैसा असला कीं, सुख, सुरक्षितता आणि सत्ता मिळते. तुमचा सामाजिक दर्जा केवढा? बँकेंत तुमची ठेव असेल तेवढा. सगळ्यांना हेंच शिकाविलें जातें. आणि मग पैशाचा पाठलाग करण्याची शर्यत सगळ्यांमध्यें लागते. पैशाचा पाठलाग करण्याची शर्यत हेंच मानवी जीविताचें सार होऊन बसलें आहे. हीच शर्यत अखंड व सर्वत्र चालू आहे. दरिद्री मनुष्य रोजच्या पोटभर अन्नासाठीं झगडतो. यंदांचें अन्न भरपूर असणारा पुढील सालच्या अन्नासाठीं झटतो आणि लखपति कोटयधीश होण्यासाठीं धडपडाट करीत असतो. आपणा सर्वांना सौंदर्य आणि आनंद हवा ना? पण मग तो या सतत धावपळींत केव्हां आणि कसा मिळणार? लखपतीनें स्वतः कोटयधीश होण्याची हाव आधीं न धरतां आज ज्यांची उपासमार होत आहे त्यांना पोटभर अन्न आधीं मिळूं द्यावें म्हणजे जगांतील सौंदर्य व आनंद यांचा लाभ व्यक्तिमात्रास होईल. पण लखपति असें करीत नाहीं. लखपतीला वाटतें 'हे लाख रुपये संपल्यावर पुढें आपली काय व्यवस्था?' आपल्या सातव्या पिढीच्या वंशजाला जर आपण शिल्लक ठेविली नाहीं तर त्याला पोट भरण्यास अन्न मिळेल असा भरंवसा काय? लाखांनीं मिळणारें सुख कोटींनीं शंभरपट कां करूं नये? जगांत बाकीचे लोक उपाशी असतील; पण त्यांना आपण कितीसे पुरे पडणार? आणि आपण अधिक न मिळवलें म्हणून बाकीचें जग थोडेंच थांबणार आहे? एकूण प्रत्येकानें अधिकाधिक पैसा मिळवीत राहावें, केव्हांही– कोठेंही थांबूं नये हें प्रत्येकाचें

ध्येयच होऊन बसतें. आणि मग तें कसें मिळवावें याला धरबंध कांहींच राहत नाहीं. सामान्य माणूस म्हणतो, "मला उपासमारीच्या संकटांत घालून या धनिकानें खूप नफा मिळविला, मग याला पिस्तुलाच्या धाकानें मरणाच्या संकटांत घालून आपण तरी याचें धन कां लुबाडूं नये?" रोजगारधंदा मिळविण्याला व धन प्राप्त करून घेण्याला जर 'स्वाभिमाना'चें साधन दुसरें कांहीं नसलें तर हा पिस्तुलाचा मार्ग कां न पत्करावा? कारखानदार मजुराला अडवून पिळून घेतो ही चोरी नव्हे, मग मजुरी मिळेना म्हणून 'चोरी' करतो तो तरी 'चोर' कां मानला जावा? या समाजव्यवस्थेनेंच त्याला चोर बनवलेलें नाहीं का? समाजांतील सगळ्या गुन्हेगारीस ही व्यवस्था अथवा अव्यवस्थाच कारण झालेली नाहीं काय? कायद्यानें धनिकांच्या 'गुन्हेगारी'स सवलत दिली आणि गरीबांच्या गुन्हेगारीस तेवढी 'गुन्हेगारी' ठरवून शिक्षा केली म्हणून गुन्हेगारीची प्रथा कांहीं नाहींशी होऊं शकत नाहीं. हा कायदा म्हणजे राज्यव्यवस्था आहे तोंवर ही गुन्हेगारी चालणारच.

---

## सोशॅलिस्ट व कम्युनिस्ट : : : ३

अराज्यवाद्यांचे राज्यसंस्थेविरुद्ध असलेले जे आक्षेप वर दिले ते भांडवलशाही राज्यसंस्थेविरुद्ध असून सोशॅलिस्ट व कम्युनिस्ट यांचे-ही भांडवलशाही राज्यसंस्थेविरुद्ध हेच आक्षेप जाहेत. धनोत्पादन-साधनें सार्वजनिक मालकीचीं करणें हाच यावरील उपाय असें त्यांचें म्हणणें असतें. सोशॅलिस्टांच्या मतें धनोत्पादनसाधनें सार्वजनिक

करण्याचें कार्य हळूहळू लोकमत तयार करून व थोडथोड्या सुधारणा पदरांत पाडून घेऊन क्रमाक्रमानें यशस्वी व्हावयाचें आहे. पण राज्यसंस्थाच नको हें त्यांना पटत नसून मुख्यतः लोकशाही-प्रधान राज्यसंस्थेच्या द्वाराच ही भांडवलशाही नाहींशी करून समाज-वादी राज्यसंस्था व समाजघटना निर्माण करतां येईल, मात्र राज्य-संस्था ही कायम टिकविलीच पाहिजे असा सोशॅलिस्टांचा आग्रह आहे. कम्युनिस्टांना धनोत्पादन-साधनें सार्वजनिक करण्याचें कार्य लोकशाहीप्रधान राज्यसंस्थेनें घडून येणारें नसून त्यासाठीं भांडवल-शाहीविरुद्ध बंड उभारलें पाहिजे व मग कामगारांची मुखत्यारी अस-लेलें राज्य स्थापून हळूहळू सोशॅलिस्ट समाजव्यवस्था स्थापन करीत करीत पूर्ण अराज्यव्यवस्था निर्माण करणें शक्य होईल असें वाटतें; पण राज्यसंस्था एकदम नाहींशी करणें शक्य नाहीं असें कम्युनिस्टांचें म्हणणें आहे. अराज्यवाद्यांना सोशॅलिस्ट व कम्युनिस्ट या दोघांचींही हीं मतें मान्य नाहींत. अराज्यवादी या दोन्ही पंथांना काय उत्तरें देतात तें पाहूं.

## ‘सावकाश व हळूहळू’

लोकमत हळूहळू बदलून बहुमताच्या पाठिंब्यानें प्रगतिकारक कायदे करणें आणि क्रमाक्रमानें धनोत्पादक साधनें सरकारच्या मालकीचीं करणें हें सोशॅलिस्टांचें धोरण आहे. पण अराज्यवादी म्हणतो एकदां अमुक एक गोष्ट अनर्थकारक आहे असें ठरल्यावर तिचा हळूहळू नाश करावा या म्हणण्याचा अर्थ काय? ‘दांत किडला आहे, तो दुखतो आहे आणि दुसरे दांत त्यामुळें भराभर किडणार आहेत, तेव्हां मूळचा किडका दांत ताबडतोब व एकदम उपटून टाकला पाहिजे’ हें सांगायला हवें का? त्याप्रमाणें धनो-

त्पादक साधनें सार्वजनिक मालकीचीं करायचीं, केलींच पाहिजेत, असें एकदां ठरल्यानंतर 'सावकाश आणि हळूहळू' हें काय?

खरी गोष्ट अशी आहे कीं, हळूहळू समाजसुधारणा करूं व समाजवाद स्थापूं म्हणणारे लोक एक मूर्ख तरी असतात अथवा लबाड तरी असतात. माणसांचा स्वभाव व मतें सुधारलीं पाहिजेत म्हणजे समाजवाद येईल असें त्यांना म्हणावयाचें असतें. पण याचा खरोखर अर्थ काय? माणसांचा स्वभाव अथवा मतें बदलणार कशीं? समाजवादी म्हणतात, समाजास अपायकारक असें वर्तन करणाऱ्यांना आपण शिक्षा करणार; जशी गरीबांना शिक्षा करणार तशीच ती श्रीमंतांनाही करणार चोरी करणाऱ्या गरीबाला जशी शिक्षा करणार त्याप्रमाणें मजुराकडून फाजील काम घेणाऱ्या कारखानदारालाही करणार; आपले कारखाने अथवा शेतजमीन अथवा इतर भांडवल समाजाच्या उपयोगापासून दूर ठेवील त्या मालकालाही शिक्षा करणार. श्रमजीवी वर्गाच्या कल्याणाचे कायदे करणार. पण हें सगळें केलें तरी माणसांचे स्वभाव आणि मतें बदलणार कशीं? एक तर कायदे जितके अधिक त्यापेक्षां त्यांतून निसटून जाणाऱ्या पळवाटा अधिक निघतात. आणि या पळवाटा शोधणें हाच एक माणसाच्या बुद्धीला नवा व्यवसाय करावा लागतो. अमेरिकेंत गुन्हेगारीविरुद्ध अनेक कडक कायदे आहेत. पण सगळ्या जगांत अमेरिकेइतकी 'सुधारलेली' गुन्हेगारी कोठेंच नाहीं. गुन्हेगारांनीं चोऱ्या, दरोडे व माणसें पळविणें या कामासाठीं आगगाड्या, मोटारी, बंदुका, बॉंब वगैरेचा सर्रास उपयोग चालविल्याचें ऐकूं येतें. कारखानदारांवर, जमीनमालकांवर व बँकवाल्यांवर रूझवेल्ट यांच्या अमदानींत जितकीं बंधनें घातलीं गेलीं तितकीं सर्व त्यांनीं अनेक पळवाटा काढून झुगारून लावलीं. हेन्री फोर्डसारख्या विख्यात कारखानदारानेंहि हजार

हिकमती लढवून सरकारी बंधनें झुगारलीं आणि रूझवेल्ट यांचा आर्थिक कार्यक्रम फसला असें आतां रूझवेल्ट यांचे पक्षपातीही कबूल करूं लागले आहेत. हें कायद्याचीं बंधनें चुकविण्यासंबंधानें झालें.

गुन्ह्याच्या शिक्षेनें तरी माणसांचे स्वभाव आणि मतें कशीं बदलणार? शिक्षा जितकी कडक तितकीं माणसें अधिक निढावतात. सगळ्या जगांतल्या तुरुंगखात्याचे अहवाल हेंच सांगतात. तुरुंगवास भोगलेला मनुष्य एक समाजाला तरी मुकतो, अथवा निर्दय व निर्लज्ज बनून कायमचा समाजकंटक तरी होतो. म्हणून गुन्हे ज्या कारणांनीं होतात, गुन्हेगारीच्या स्वभावाचें ज्या कारणांनीं पोषण होतें तीं कारणें नाहींशीं झालीं पाहिजेत. हीं कारणें कोणतीं?

गरीबांना निर्धनता आणि बेकारी यामुळें चोरीकडे धाव घ्यावी असें वाटतें. पण धनिकांनाही अनिश्चिततेचें संकट केवढें मोठें आहे? परस्परचढाओढीवर आधारलेल्या या समाजांत लखपतीलाही स्वतः-च्या भवितव्याचा भरंवसा कोठें आहे? म्हणून तो अधिकाधिक मिळविण्याची हाव धरतो व समाजाची पिळणूक चालवितोच. ही अनिश्चितता व बेकारी क्रमाक्रमानें कशी जाणार? जे आज कोटय-धीश आहेत त्यांना समाजांतील बेकारी व अनिश्चितता नाहींशी होण्यानें आपलें नुकसान होईल हें ठाऊक असतें आणि ते सर्व शक्ति खर्च करून सरकारचा हळूहळू सुधारणेचा कार्यक्रम हाणून पाडतात असाच अमेरिकेस अनुभव आला. अशा बलवान् कोटय-धीशांना निर्बल करण्याचा उपाय म्हणजे त्यांना फुरसत व संधि मिळूं न देतां त्यांचीं धनोत्पादन-साधनें एकदम हिरावून घेणें हाच होय. अशीं थोडींही माणसें समाजांत आहेत तोंवर तीं समाजांतील बेकारी व अनिश्चिति नष्ट होऊं देणारच नाहींत. मजुरांना पिळणें व सट्टेबाजी करणें यावरच ज्यांचें जीवन अवलंबून आहे त्यांना बेकारी

व अनिश्चिति नाहींशी करणें कसें खपणार? उलट समाजांत थोडीही बेकारी व अनिश्चिति असेतोंवर गुन्हे कसे नाहींसे होणार? गुन्हे करणाऱ्यांसाठीं तुरुंग बांधलेत तरी काय उपयोग? "तुमच्या घरांतला पाण्याचा नळ फुटला आहे असें समजा; मग त्याचें गळणारें भोंक लहान असो कीं मोठें असो; गळून जाणारें पाणी पकडण्यासाठीं वाटल्यास तुम्ही बकेटें त्याखालीं ठेवा. पण त्यानें गळती कांहीं थांबणार नाहीं." अनेक भोंकांपैकीं कांहीं बंद केलीं तरी नळ गळण्याचें थांबणार नाहीं. सगळी गळती एकदम काढून टाकून नळ साफ धड केला पाहिजे अथवा नवाच घातला पाहिजे. याचाच अर्थ क्रम-विकासानें हळूहळू प्रगति होणें अथवा समाजवाद येणें अशक्य असून क्रांतिमार्गानेंच धनोत्पादन-साधनें सार्वजनिक मालकीचीं केलीं पाहिजेत असें अराज्यवाद्यांचें म्हणणें आहे.

## कम्युनिझम्‌मधील दोष

हळूहळू प्रगतीविरुद्ध कम्युनिस्टांचाही हाच आक्षेप आहे. आणि भांडवलशाहीविरुद्ध बंड उभारून व भांडवलशाही राज्यसत्तेचा सक्तीनें व एकदम पाडाव करून कामगारराज्य स्थापिलें पाहिजे असें कम्युनिस्टांचें म्हणणें आहे. पण अराज्यवाद्यांना समाजवाद्यांचा विकासवाद अमान्य आहे, तसाच कम्युनिस्टांचा क्रांतिवाद व कामगारराज्य हींही अमान्यच आहेत. कारण, त्यांच्या मतें, राज्यसंस्था, मग ती कोणाच्याही हातीं असो, वैयक्तिक जीवनावर त्यानें दडपण येतेंच. कामगार-सत्ता म्हटली तरी सर्वच्या सर्व कामगार कांहीं राज्य चालवीत नाहींत. ज्या थोड्या लोकांच्या हातीं कामगारवर्गाचें पुढारी-पण येतें तेच राज्यसूत्रें हातीं घेतात. धनोत्पादन-साधनें सार्वजनिक करणें हें या कामगार राज्यसंस्थेचें ध्येय असल्यानें राज्यकर्त्यांना

वैयक्तिक धनलोभ कांहीं नसेलही. पण सत्तालोभ असतोच. आणि त्याची ओढ धनलोभापेक्षांही अधिक असूं शकते. सत्ताप्राप्तीसाठीं कर्तबगार माणसांत चुरस लागते आणि जनतासेवेपेक्षां जनतेला भुलवून पुढारीपण बळकावण्याच्या कारवाया हे कर्तबगार लोक करूं लागतात. भांडवलशाहीच्या पुरस्कर्त्यांच्या इतक्याच यांच्या कारवायाही हीन असूं शकतात. कारण सत्तालोभ दोघांतही सारखाच असतो. प्रत्यक्ष क्रांति सुरू असतां सर्व जनता क्रांतिकार्यांत उत्साहानें भाग घेत असते; सर्वस्वाचा त्याग करीत असते. पण एकदां क्रांति पार पडून नवीन राजवट सुरू होण्याची वेळ आली कीं 'पुढारी' पुढें येतात व त्यांच्यांत अधिकारबळकावणीसाठीं स्पर्धा सुरू होते. ज्यांचे हातीं अखेरीस सत्ता येते ते ती सत्ता टिकविण्यासाठीं आपल्या प्रतिस्पर्ध्यांना व जनतेंतील त्यांच्या अनुयायांना नेस्तनाबूत करतात. जनतेचें वर्तन आपल्याविरुद्ध होऊं नये म्हणून जनतेच्या चळवळी दडपून टाकतात. आपलींच ढोलकीं जनतेपुढें पिटणारे मत-प्रचारमंत्री जनतेंत सोडतात आणि स्वतःची विचारसरणी जनतेवर लादूं लागतात. हळूहळू जनता व्यक्तिशः रोजच्या व्यवहारांत रुळूं लागून सार्वजनिक जीवनाबद्दल बेफिकीर बनेल असें वातावरण उत्पन्न केलें जातें. परराज्यांच्या आक्रमणाचें भूत जनतेपुढें उभें करून व जनतेस भेदरवून टाकून सरकारवर जनतेचा अंधविश्वास निर्माण करण्यांत येतो. राज्यकार-भाराच्या धोरणांत गौप्य निर्माण होतें. सरकारी अधिकारी समाजांत आपलें वजन राहावें म्हणून बडेजावानें वागूं लागतात. यामुळें त्यांची राहणी खर्चिक होते व त्यांना समाजांतील इतरांहून अधिक वेतन देण्यांत येऊं लागून समाजांत आर्थिक विषमता सुरू होते. या विषमतेंतून भांडवलशाही निर्माण होण्याचा धोका रोजच्या रोज वाढत जातो.

## जेथें राज्य तेथें अन्याय

सारांश, राज्यसंस्था म्हटली कीं समाजांतील व्यक्तींवर पार-तंत्र्याचें बंधन येतेंच. हें पारतंत्र्य शारीरिक, बौद्धिक, आर्थिक सर्व प्रकारचें असून, समाजांत भयंकर विषमता उत्पन्न करण्याचें, टिक-विण्याचें, वाढविण्याचें काम राज्यसंस्था करते. विषमता व अन्याय नाहींशीं करण्यासाठीं राज्यसंस्थेचें अस्तित्व आहे असें कोणीही कितीही म्हणो, राज्यसंस्था आहे तोंवर अन्याय व विषमता नाहींशीं होणारच नाहींत. कारण राज्यसंस्था म्हणजे अखेरास तीं कांहीं माणसेंच असतात व राज्यसंस्था टिकवून धरण्यांत त्यांना धन व सत्ता यांचा लाभ होत असतो. राज्यसंस्था नाहींशी झाली तर हें धन व ही सत्ता मिळणें शक्य नसतें. अर्थात् राज्यसंस्था टिक-विण्याचा म्हणजेच अन्याय व विषमता टिकवून राज्यसंस्थेची गरज कायम ठेवण्याचा यत्न, हे राज्यसंस्था-चालक नेहमींच करीत राह-णार हें स्वाभाविकच आहे. गांवांतलीं दुखणीं अजीबात नाहींशीं व्हावीं असें डॉक्टरांना कधीं तरी वाटेल का? गांवांतलीं भांडणें मिटावीं असें वकिलांना कधीं वाटेल का? त्याचप्रमाणें गुन्हेगारी नाहींशी व्हावी असें पोलिसला कधींच वाटणार नाहीं आणि अन्याय, विषमता अजीबात नष्ट व्हावी असें राज्यसंस्थेच्या चालकांनाही कधीं वाटणार नाहीं. म्हणून राज्यसंस्था—मग ती सोशॅलिस्ट अथवा कम्युनिस्ट कशीही असो—आहे तोंवर अन्याय व विषमता कधींही नष्ट होणार नाहींत. ही उपद्रवकारक राज्यसंस्था नष्ट केल्यानेंच समाजांत स्वातंत्र्य व सौख्य नांदणें शक्य आहे.

---

*

# अराज्यवादाची सयुक्तिकता : : : ४

## निर्जन बेटावर वसाहत

'पण राज्यसंस्थाच नसेल तर चोऱ्या होतील ना?' असा आक्षेप आक्षेपक घेईल. पण अराज्यवादी उलट विचारतो, 'कां हो, कां होतील चोऱ्या? चोरी करण्यांत कांहीं मजा आहे म्हणून का लोक चोऱ्या करतात?' लोक चोरी करण्याला कां प्रवृत्त होतात याचीं कारणें शोधलीं तर तीं कारणें नाहींशींही करतां येतील. समजा, आपण वीसपंचवीस माणसें जहाजांतून प्रवास करीत असतां आपलें जहाज फुटलें आणि आपण एका निर्जन बेटाला लागून त्यावर आपण चढलों. तेथलीं झाडें फळभारांनीं लवलीं आहेत आणि अन्नसंपत्ति तेथें विपुल आहे. अर्थात् बेटावर चढतांच आपण हीं फळें व अन्न यांचा वापर सुरू करूं. पण आपणांपैकीं एकानें हीं सर्व फळें, अन्न आणि तें सगळें बेटही आपलें एकट्याचें आहे असें सांगितलें व त्याच्या उपभोगासाठीं तो पैसे मागूं लागला तर? आम्हांला राग येईल आणि हसूंही येईल. 'काय उद्दाम आणि मूर्ख माणूस आहे हा!' असें आम्ही म्हणूं. आणि जर तो त्या फळांचा आणि अन्नाचा आम्हांला उपभोग घेऊं देईनासा झाला तर सगळे मिळून आपण त्याला पिटून काढूं अथवा समुद्रांत फेकून देऊं, नाहीं का?

## 'सरकारी कायद्या'चा दरोडा

पुढें कांहीं पिढ्या आपण त्या बेटाची मशागत करून तें आधिकच समृद्ध केल्यावर बाहेरून एक गृहस्थ जहाजांतून त्या बेटावर आला

आणि आपल्या पोतडींतून एक कागद काढून 'या बेटाचा मी मालक आहें' असें त्या कागदाच्या आधारानें म्हणूं लागला, तर? —तर 'बस् कर तुझी वटवट, कागद घाल चुलींत, वाटेल तर आमच्या बरोबर कष्ट करून इथें राहा नाहीं तर आल्या वाटेनें चालूं लाग' असें आपण त्याला म्हणूं. आणि हेंच बरोबर नव्हे का? पण तो परत जाऊन एखाद्या 'सरकार'चें सैन्य घेऊन येईल, आम्हांवर बाँब टाकून आमचा पराभव करील आणि 'कायदेशीर'पणें आमच्या बेटाचा मालक होईल. बेटावरील जमीन, खाणी, जंगलें आणि आम्हीं उभारलेले कारखाने वगैरे आपलेच आहेत असें म्हणूं लागेल. मग नफ्यासाठीं माल किती निर्माण करावयाचा हें ठरवून जरूर तेवढेच लोक कामावर नेमील. पण मग बाकीच्यांना रोजगार नाहीं. मग त्यांनीं खावें काय? मग ते हाताशीं लागेल त्या संपत्तीचा अपहार करतील आणि मग ते 'चोर' ठरून त्यांना शिक्षा होईल. पण खरोखर ही सर्व बेटावरील संपत्ति मूळची त्यांचीच ना? त्यांच्याच संपत्तीवर बाहेरून या नव्या 'मालका'नें दरोडा घातला आणि खऱ्या मालकांना हुसकावून लावून आपण मालक झाला व खऱ्या मालकानें आपल्या संपत्तीला हात लावला असतां तो मात्र 'चोर' ठरत आहे. पण ही 'चोरी' सरळ मार्गानें रोजगार व अन्न मिळालें असतें तर या 'चोरा'नें केली असती का? 'चोरी' करण्यांत श्रम, काळजी, धोका किती तरी आहे! तो काय चोराला कळत नाहीं? यापेक्षां कमी श्रम, कमी काळजी व कमी धोका पत्करून चरितार्थाचें प्रामाणिक साधन 'चोरा'ला मिळेल तरीही तो चोरी करीलच का?

वर आपण पाहिल्याप्रमाणें राज्यसंस्थेनें प्रथम दरोडा घालून कांहीं लोकांना चोरी केल्यावांचून जगतांच येऊं नये अशी परिस्थिति

निर्माण केली आणि मग चोराला शिक्षा करण्यासाठीं आतां सरकार हवें असें आपण बोलूं लागलों. पण सरकारनेंच जर चोरी होण्या-सारखी परिस्थिति आणि त्यांतून चोर निर्माण केले व ती परिस्थिति सरकार टिकवून धरीत आहे, तर तोंवर केवळ शिक्षा करण्यानें चोरी कशी बंद होणार ?

'पण समजा, उद्यां सकाळीं अकस्मात् राज्यसंस्था नष्ट झाल्याचें आढळून आलें आणि गणूनें हातांत सुरी घेऊन गोविंदाचा खून केला तर ?' असें आक्षेपक विचारतो. पण गणू खून कां करील ? कितीही संताप आला तरी सामान्यतः दुसऱ्याच्या अंगावर हात टाकूं नये अशी शहाण्या माणसाची प्रवृत्ति असते. अशीं शहाणीं माणसेंच समाजांत बहुसंख्य असतात. जीं माणसें थोड्याशा कारणांनीं हातांत शस्त्र घेतात अथवा मारामारीस प्रवृत्त होतात तीं माणसें मनानें दुखणाईत आहेत असें मानलें पाहिजे. हा मानसिक दुखणाईतपणाही राज्य-संस्थेनें समाजाच्या केलेल्या कोंडीमुळेंच निर्माण झाला आहे. आणि राज्यसंस्था नष्ट झाली कीं ही कोंडीही कमी होईल व मानसिक दुखणाईतपणाही कमी होईल. पण असा थोडासा मानसिक दुख-णाईतपणा म्हणजे आततायीपणा राहिला तरी त्यासाठीं कडक शिक्षा देणाऱ्या तुरुंगाची गरज नाहीं. मानसशास्त्रज्ञ व मानसिक रोगांचे डॉक्टर यांचे देखरेखीखालीं मानासिक दवाखान्यांत अशीं माणसें ठेवावीं म्हणजे झालें. अशा उपायानेंच आततायीपणास खरा आळा बसेल.

## राज्याशिवायही सुव्यवस्था

पण राज्यसंस्थेची सवय अथवा खोड आम्हांला इतकी दृढतेनें लागलेली आहे कीं, ऑक्सिजनवांचून जसें आपण जगूं शकणार

नाहीं तसंच राज्यसंस्थेवांचूनही आपण जगूंच शकणार नाहीं असें आपणांस वाटत असतें. आतां राज्यसंस्थेचा आपल्या जीवितांत नेमका उपयोग होतो कुठें? तिचें स्थान आपल्या जीवनांत कोणतें आहे? याचा आपण कधीं विचार केला आहे का? राज्यसंस्था आपणांसाठीं काय करते? अन्न, वस्त्र, आश्रय वगैरे सर्व वस्तु माणसें स्वतःच्या श्रमानें प्राप्त करून घेतात. आपण आजारी असलों तर राज्यसंस्थेच्या पोलिसाची मदत न घेतां डॉक्टराची घेतों. तुम्हांला जी निसर्गानें अक्कल दिलेली आहे ती राज्यसंस्थेचा पोलीस वाढवूं शकतो का? आजारीपण, म्हातारपण, मरण यांपैकीं कोणती गोष्ट पोलीसच्या अथवा लष्कराच्या मदतीनें चुकवितां येते? यांपैकीं कोणतीही गोष्ट न करणारी राज्यसंस्था आपणांस अत्यवश्य वाटते हा एक चमत्कारच आहे. 'पण कायदा व सुव्यवस्था कोण ठेवणार?' अशी शंका येतेच. राज्यसंस्था कोणता कायदा व कोणती सुव्यवस्था ठेवते हें आपण वर जें बेटाचें उदाहरण घेतलें तेव्हां आपणांला कळलेंच. 'पण रस्त्याच्या डाव्याच बाजूनें वाहनें चालवावीं हा नियम सुव्यवस्थेस अवश्य आहे ना?' मग त्याच्या बजावणीसाठीं तरी कायदा आणि पोलीस नको का? कांहीं जरूरी नाहीं. मोटारवाल्यांनीं मोटारी एकीमेकींवर घालूं नयेत, पायीं चालणारांनीं मोटारीपुढें जाऊं नये, या नियमांची अंमलबजावणी केवळ माणसांच्या समंजसपणानें होणार आहे. आणि माणसें समंजस नसलीं तर केवढाही पोलीस-बंदोबस्त ठेवूनही मोटारचे अपघात टळणार नाहींत. माणूस कळप करून राहणारा म्हणजे सामाजिक प्राणी आहे. आपलें व आपल्या धनदौलतीचें रक्षण करण्यासाठीं आणि आपल्या जीवनाच्या गरजा भागविण्यासाठीं माणसांना परस्पर सहकार्य करावेंच लागतें आणि एकमेकांची गरज भागवावीच लागते. सरकार नांवाच्या संस्थेच्या

सक्तीवांचून आपण अशा किती तरी संघटना करीत असतों. आपण एकादें क्रीडामंडळ अथवा संगीतसमिति चालवितों. तसेंच शास्त्रज्ञ, लेखक, कलावंत आणि संशोधक आपापल्या कार्याला स्फूर्ति व सहकार्य मिळविण्यासाठीं स्वेच्छेनें संघटित होत असतात. त्यांची अंतःप्रेरणा आणि त्यांच्या गरजा यांमुळें माणसें संघटित होतात. त्यांना राज्यसंस्थेची अथवा दुसऱ्या कोणाचीही सक्ती लागत नाहीं. परस्परसंरक्षण अथवा परस्परसाहाय्य यासाठीं माणसांनीं संघटित होणें अवश्य असतेंच व माणसें होतातही. संरक्षणासाठीं व व्यवहारासाठीं वस्तूंची रचनाही विशिष्ट तऱ्हेनें करावी लागते. खड्डा अथवा विहीर असेल तेथें माणूस अथवा जनावर पडूं नये म्हणून भिंत घालावी लागते. सुंदर बागा अथवा उघड्यावरील सुंदर पुतळे यांची मुलांनीं अथवा गुरांनीं नासधूस करूं नये म्हणून त्यांना कांट्यांच्या तारा लावाव्या. चार रस्ते मिळणाऱ्या चौकावर 'डाव्या बाजूनें जा' अशा पाट्या, तांबड्या हिरव्या कांचा व दिवे वगैरे ठेवणें अवश्य आहे. खाजगी जागा आणि सार्वजनिक जागा यांचा फरक दाखविण्यासाठीं पाट्या हव्यातच. पण हें सर्व माणसें समंजस-पणानें करतील व पाळतीलही. त्यासाठीं पोलीस कशाला ?

## गुन्हेगारीचा निरास

गुन्ह्यांना शिक्षा करण्यासाठींही पोलीस नको आहे. कारण मागें म्हटल्याप्रमाणें पोलिस म्हणजे सरकार जिवंत आहे तोंवर गुन्हे निर्माण होणारी परिस्थिति कायम राहणारच. ही परिस्थिति नष्ट करणें हें अराज्यवादाचें प्रमुख ध्येय आहे. ' समाजांत होणारे पुष्कळसे गुन्हे सरकार, त्याचा जुलूम व अन्याय, सरकारमार्फत टिकविली जाणारी विषमता व दारिद्य यांमुळेंच पुष्कळसे होतात. राज्यसंस्था नष्ट होतांच यांतले पुष्कळसे गुन्हे नाहींसे होतील. पुढें मत्सर,

दुर्दम मनोविकार, आज जगांत प्रभावी असणारे अत्याचार व सक्ती यामुळें अंगीं जडलेल्या भावना, यामुळें राज्यसंस्था नष्ट झाल्यावरही कांहीं गुन्हे होत राहतीलच. पण राज्यसंस्थेचें रोगट वातावरण जसजसें निवळेल, तसतसे हे कमी होत जातील व माणूस अधिक समंजस, जबाबदार होत जाईल.' गुन्हेगारास पकडून त्यास तुरुंगांत टाकणें हें अराज्यवादाचें वैशिष्टच नसून राज्यसंस्था नष्ट होऊन अराज्यवादास प्रारंभ झाला कीं, गुन्हेगारास खाऊं-पिऊं घालून व त्याच्याभोंवतीं सुखाचें व समाधानाचें वातावरण निर्माण करण्यांत येईल. यामुळें गुन्हा करण्यापेक्षां समाजाची सेवा करून समाजाशीं सहकार्य करणें हेंच शहाणपणाचें व स्वाभिमानाचें आहे असें त्यास पटूं लागेल. समंजसपणा, नाश व नुकसान यांची भीति, परस्पराबद्दल आदरभाव आणि स्वाभिमान म्हणजे अब्रूची चाड, यांनींच आजच्या समाजांत पोलिसांपेक्षांही शांतता व सुव्यवस्था राखली आहे. दंगे करणें, गुन्हे करणें हा मनुष्यस्वभाव असता तर माणसागणिक पोलीस ठेवावा लागला असता आणि हा पोलिसही माणसांतला नव्हे तर कोणी तरी देवदूतच त्यासाठीं आणावा लागला असता. आज शंभर माणसांस एक पोलीस असेंही प्रमाण बसत नाहीं. एक पोलीस शंभर माणसांस शिस्तींत ठेवतो, तें हीं शंभर माणसें जात्या अवखळ असतीं तर शक्य झालें असतें का? आणि जीं शंभरांत ५ माणसें अवखळ असतील त्यांना बाकीच्या पंचाण्णवांनीं सुखी ठेवून शिकविण्याचें, व सुधारण्याचें ठरविल्यास पोलिसाचे दंड्यापेक्षा या ९५ माणसांच्या शुश्रूषेनें व शिकवणीनेंच तीं 'वठणीवर' येण्याचा अधिक दृढ संभव आहे.

## अराज्यवाद आणि धनिकवर्ग

खरोखर जे आपणांस धनिक म्हणवतात त्यांनाही अराज्यवादाची

भीति वाटूं नये. विद्वानांना जें आपण देतों, जें आपण रोज खातों अथवा उपभोगतों तेंच धन खरोखर आपलें असें म्हणतां येईल. बाकीचें धन अहोरात्र पहारा करून जपत राहणें म्हणजे कुणाच्या तरी परक्याच्या धनाचीच ती राखण नव्हे का?[1]

पण ही राखण आपण कां करीत असतों? याचें कारण असें कीं, राज्यसंस्थेनें समाजांत सुरक्षितता अथवा निश्चितता कुणालाच ठेविलेली नाहीं. धनिकांच्या मालकी हक्काचें संरक्षण राज्यसंस्था करते खरी; पण धनिकांच्या परस्पर चढाओढींत शेकडों लहान धनिक भिकेस लागून थोडे धनिक अधिकाधिक गबर होत जातात. हे थोडेही आपसांत चढाओढ करून एकमेकांचे गळे दाबीत असतात. आणि बहुसंख्य समाज बेकारी व दारिद्र्य यांनीं गांजला जाऊन बाजारांतील माल खरेदी करण्यास असमर्थ होत गेल्यानें या धनिक व्यापाऱ्यांचा व कारखानदारांचा माल पडून राहून, कुजून सडून नासून जातो आणि या धनिकांचीं दिवाळीं निघतात. हे अनर्थ केव्हां कोसळतील याचा धनिकांना कधींच अंदाज लागूं शकत नसल्यानें पैशाच्या राशींच्या राशी भावी संकटास व अनिश्चितीस तोंड देण्यासाठीं धनिक वर्ग राखून ठेवीत असतो.

पण असे पैसे कोंडून ठेवण्यानें समाजाचें दारिद्र्य व अनिश्चिति अधिकच वाढून धनिकांवर संकट कोसळण्याचा संभव अधिकच वाढत जातो. धनोत्पादनसाधनांवर धनिकांना मालकी हक्क गाजवूं देण्याची प्रथा जोंवर जिवंत आहे तोंवर अनर्थ व अनिश्चितीच्या भीतीनें धनसंचय आणि धनसंचयामुळेंच आर्थिक अनर्थ व अनिश्चिति

१ यद्ददासि विशिष्टेभ्यो यच्चाश्नासि दिने दिने।
तत्ते वित्तमहं मन्ये शेषं कस्यापि रक्षसि ॥

यांची वाढती परंपरा उत्पन्न होणें हें दुष्ट चक्र कधींहि संपूं शकत नाहीं. राज्यसंस्थाच नाहींशी झाली व तिच्याबरोबर धनोत्पादन-साधनांवरील मालकीहक्क नष्ट होऊन धनोत्पादनसाधनें सार्वजनिक मालकीचीं झालीं म्हणजे श्रम करणाऱ्या सर्वांना भरपूर अन्न, वस्त्र, आश्रय, सुखसोयी यांचा लाभ होईल आणि आर्थिक अनिश्चिति नाहींशी होऊन पैसा उगीचच्या उगीच ढिगांवर ढीग साचवीत राहण्याचा मोह धनिकांना होणार नाहीं. या दृष्टीनें पाहतां आजच्या धनिकांनाही अराज्यवाद विचारांतीं व अनुभवांतीं सुखकरच वाटेल असें म्हणावें लागतें.

## अराज्यवाद व मनुष्यस्वभाव

चोहोंकडे पूर्ण सलोख्याचें वातावरण, आर्थिक अनर्थाचा व अनिश्चितीचा अभाव अशी परिस्थिति निर्माण झाली असतां मनुष्य-स्वभावाच्या उन्नतीस केवढी प्रचंड संधि निर्माण होईल याची पुरेशी कल्पना आजच्या परिस्थितींत आणून देणेंच कठिण आहे. " शास्त्रीय संशोधकाला दुपारची काळजी न राहतां आपल्या आवडत्या संशोधन व्यवसायांत तो गढून राहील. आपल्या संशोधनानें जगाचें कल्याण करण्यासाठीं त्याला सर्व प्रकारच्या सोयी व सवलती मिळतील. लेखक, कवि, कलावंत या सर्वांना स्वातंत्र्य व सलोखा यांच्या विमानांवर आरूढ होऊन स्वोन्नतीच्या केवढ्याही उच्च अंतरिक्षांत भरारी मारतां येईल. खरोखर न्याय व मानवी हक्क यांना अशा परिस्थितींतच खरें अस्तित्व लाभणार आहे. माणसांच्या सद्भावनांचें कर्तृत्व लहान-सान असतें असें नाहीं. आपण केवळ भाकरीसाठीं व भाकरीवरच जगतों हा शुद्ध भ्रम आहे. शारीरिक गरजा भागविल्यावांचून जिणेंच अशक्य हें अगदीं खरें. पण केवळ शारीरिक वासना शमविण्यानें

जीवन पूर्ण होत नाहीं. लक्षावधि लोकांना उत्पन्न झालेल्या धना-पासून हल्लींच्या समाजव्यवस्थेनें दूर राखल्यामुळें सगळ्या मानवी विश्वाचें केंद्र पोट हेंच झालें आहे. पण विवेचक पद्धतीनें स्थापन झालेल्या समाजांत सर्वांना भौतिक धन विपुल मिळून केवळ जगणें, भरपूर अन्न, वस्त्र, आश्रय, सुखसोयी मिळणें, ही हवापाण्यासारखी सुलभ व मामुली बाब होईल. परस्परसहानुभूति, न्याय, हक्क वगैरे भावनांना भरपूर पोषक अन्न व अनुकूल परिस्थिति मिळून त्यांचा विकास व वाढ होऊं शकेल. आजही शेंकडों हजारों वर्षांच्या जुलमाखालीं, मानवी स्वभाव नासून जाईल अशा परिस्थितींत ही न्यायबुद्धि माणसाच्या अंतःकरणांत जागृत राहिलेली आहे. तिचा बींमोड झालेला नाहीं व होणें शक्य नाहीं. कारण न्यायप्रेम व सहानुभूति या भावना मानवी अंतःकरणांतच जन्मलेल्या व अंगभूत असून सुखलाभ करून घेणें व जिवंत राहूं इच्छिणें या भावना जितक्या दृढ आहेत तितक्याच न्यायप्रेम व सहानुभूति या भावनाही दृढ आहेत. जगांत माणसास आज जें दुःख आहे तें केवळ भौतिक दारिद्र्यामुळेंच उद्भवलें आहे हें म्हणणें खरें नव्हे. अन्यायाच्या टोंचणीपेक्षां पोटाची उपासमार सहन करणें माणसांना सोपें जातें. भुकेनें आंतडीं तुटतात या जाणिवेनें बंड करण्याची प्रवृत्ति माणसांत बळावते तितकी अथवा त्यापेक्षांही जलद आपणावर अन्याय होतो या जाणिवेमुळें बंडकारक वृत्तीचा अधिक जलद फैलाव होतो. प्रत्येक बंडाचें तात्कालिक कारण भूक हें असेल, पण त्याच्या बुडाशीं अन्याय व दुःख देणारांविरुद्ध जनतेच्या हृदयांत सुप्तपणें वावरणारा द्वेष असतो. खरी गोष्ट अशी आहे कीं, पुष्कळांना कल्पनाही नसते इतक्या मोठ्या प्रमाणांत हक्कप्रेम व न्यायप्रेम यांना आपल्या जीवनांत स्थान असतें. ज्यांना हें पटत नाहीं त्यांना

इतिहास ठाऊक नसतो व मनुष्यस्वभाव माहीत नसतो. लोकांना जेथें जेथें अन्याय दिसतो तेथें तेथें लोकांना त्याविरुद्ध त्वेष चढला असल्याचें आपण प्रत्यहीं पाहतों, 'छट् हें बरोबर नाहीं' असे शब्द अन्याय दिसला कीं आपोआप प्रत्येकाच्या तोंडून निघत असतात. अन्यायाची प्रत्येकाची कल्पना त्याचें शिक्षण, परंपरा, परिस्थिति यांवर अवलंबून असते हें खरें; पण कल्पना कोणतीही असो, अन्याय दिसेल तेथें त्याचा धिक्कार करणें हा मनुष्यस्वभाव आहे. हा अनुभव सर्वत्र बिनचूक येतो. ऐतिहासिक दृष्टयाही हीच गोष्ट सिद्ध होते. भौतिक कारणांपेक्षां न्याय-अन्यायाच्या कल्पनांसाठींच जगांत अधिक युद्धें लढलीं गेलीं आहेत. आपल्या न्याय-अन्यायाच्या कल्पनाही आर्थिक परिस्थितींनींच बनल्या आहेत असें उत्तर मार्क्सवादी देतील. पण लोकांना विशिष्ट ध्येयासाठीं त्याग व वीरत्व प्रगट करण्याची स्फूर्ति न्याय-अन्यायाच्या भावनेंतूनच मिळाली; केवळ आर्थिक स्वार्थांतून मिळाली नाहीं. उदाहरणार्थ, इतिहासांत शेंकडों वर्षें ख्रिस्ती, महंमदी व बुद्ध धर्मानुयायांनीं न्याय-प्रेमानेंच अन्यायाविरुद्ध लढे चालविले. न्यायप्रेमानेंच निंदा, छळ व मृत्यु अनेकांनीं सोसले. सॉक्रेटिसपासून आजवरच्या तत्त्वज्ञांनीं सत्य-प्रेमानेंच निरनिराळ्या शास्त्रांची अनेक संकटाला तोंड देऊन सेवा केली. कांहीं अपवादात्मक अशा थोर व्यक्तींसंबंधानेंच ही गोष्ट खरी नसून बहुसंख्य समाजासही अचाट कर्तृत्वाची स्फूर्ति न्यायप्रेमानेंच मिळाली आहे. ख्रिस्ती लोकांच्या धर्मयुद्धांपासून गेल्या महायुद्धापर्यंत कोट्यवधि लोकांनीं आपल्या सर्वस्वाची आहुति टाकून प्राणार्पणही केलें तें न्याय-प्रेमानेंच केलें आहे. मग मुत्सद्दयांचे हेतु कितीही बरेवाईट असोत, इतिहासाच्या अगदीं काळ्याकुट्ट काळांतही ही सद्भावना नष्ट झालेली नाहीं. " पण आजवरच्या

व हल्लींच्या पारतंत्र्याच्या काळांत माणसाच्या उदात्त भावना विकृत होतात. छळ, द्वेष, कलह यांत त्यांचें रूपांतर होतें. पण भौतिक स्वार्थ, अज्ञान, वर्ग-कलह वगैरे अधःपातकारणांपासून माणसाची मुक्तता होईल तर त्याच्या अंतःकरणांतील अजरामर असें जें न्यायप्रेम त्याचें स्वरूप वाढता बंधुभाव, वाढती सदिच्छा, वैयक्तिक शांति व सामाजिक सलोखा या रूपानें व्यक्त होईल. राज्यसंस्था नष्ट झाल्यावांचून ही परिस्थिति निर्माण होऊं शकणार नाहीं. रोजच्या भाकरीसाठीं करावा लागणारा पाशवी झगडा थांबला पाहिजे. श्रम आणि सुखसोयी या दोहोंतही सर्वांना भागीदारी मिळाली पाहिजे. माणसाच्या अंतःकरणांतील उत्तम गुणांच्या वाढीस वाव मिळाला पाहिजे, त्या वेळीं सृष्टीची अत्युत्कृष्ट संतति आपण आहों असें जें माणसास आजवर वाटलें आहे त्याचा प्रत्यक्ष अनुभव त्यास घेतां येईल. या नवजीवनांत केवढें सौंदर्य व सौजन्य आहे याची कल्पना प्रत्येक स्त्री-पुरुषास एकदांच आली तर प्रत्येकजण हें नवजीवन निर्माण करण्यासाठीं झटूं लागेल."

## अराज्यवादाबद्दल बौद्धिक खात्री

पण प्रत्येक स्त्री-पुरुषास ही कल्पना स्पष्टपणानें आणून देणें अत्यवश्य आहे. राज्य मुळींच नसलेला समाज कसा असेल याचें प्रत्येकास पूर्ण बौद्धिक आकलन झालेलें असलें पाहिजे. न्याय व परस्परसहिष्णुता हीं तत्त्वें या समाजव्यवस्थेस आधारभूत होत. राज्यसंस्था असेपर्यंत या गोष्टी पूर्णपणें अस्तित्वांतच येणार नाहींत असें अराज्यवाद्यांचें म्हणणें आहे. कोणीही कोणावर चढाई अथवा सक्ती करूं नये हें अराज्यवादाचें प्रमुख तत्त्व आहे. प्रत्येकानें स्वतंत्र असावें, प्रगतीस सर्वांना सारखी संधि मिळावी आणि समाजांत

उत्पन्न होणाऱ्या संपत्तीचा व सुखसोयींचा वारसा व भोगवटा सर्वांना सारखा मिळावा, कुणालाही कशावरही विशिष्ट हक्कदारी मिळूं नये, "एवढें साधें तत्त्व सर्वांनीं अंतःकरणांत बाणवून घेतलें तर अराज्य परिस्थिति निर्माण करणें व टिकविणें अगदींच सोपें आहे. सारांश, राजकीय दृष्ट्या कोणाचीही सत्ता मानावयाची नसल्यानें सरकार नष्ट होईल. आणि आर्थिक दृष्ट्या कोणाची हक्कदारी मानावयाची नसल्यानें धनोत्पादनसाधनांवर व सार्वजनिक उपयोगाच्या वस्तूंवर कोणाचीही खाजगी मालकी राहूं देण्यांत येणार नाहीं."

## आळसाची मीमांसा

समाजांत आर्थिक समता नांदेल याचा अर्थ सर्वांना सारखा पगार मिळेल काय? पुष्कळांना हें चमत्कारिक वाटतें. जास्ती उत्पादन करणाऱ्याला अथवा उच्च दर्जाचें काम करणाऱ्याला जास्ती वेतन नसावें का, अशी शंका विचारण्यांत येतें; पण अमक्यानें निर्मिलेलें धन अमुक हें असें ठरविण्यास काय साधन आहे? शरीरानें होणारें काम अमक्या अवयवानें केलें असें ज्याप्रमाणें म्हणतां येणार नाहीं त्याप्रमाणें समाजांत निर्माण होणारें धन अथवा सोय अमुक माणसानेंच केली असें म्हणता येणार नाहीं. कोणतेंही कार्य केवळ एकट्याच्याच बळावर व कर्तृत्वानें करतां येणार नाहीं. अर्थात् अमुक धन माझें अथवा अमक्याचें कर्तृत्व श्रेष्ठ असें म्हणण्यास समाजांत कांहींही साधन नाहीं.' 'पण अधिक मिळविण्याची ईर्षा राहिली नाहीं म्हणजे माणसें आळशी होणार नाहींत का?' हीही शंका व्यर्थ आहे. मानवी मन व मानवी व्यवहार यांचा मूलग्राही विचार केल्यास तिचें सहज निरसन होईल. अराज्यवाद्यांच्या मतें 'आळस' म्हणून मनुष्यस्वभावाचें अंग नाहींच मुळीं. ज्याला आपण आळशी

माणूस म्हणतों तों फक्त अस्थानीं पडलेला माणूस असतो. घिसाड्याला फोटोग्राफराचें काम सांगावें असा कांहींसा तो प्रकार असतो. शरीरानें आणि मनानें जें काम करण्यास आपण अपात्र असूं तें काम करण्याची पाळी आली कीं तें काम एक तर आपणाला चांगलें करतां तरी येत नाहीं अथवा आपण अळंटळं तरी करतों. उलट प्रत्येकाला कांहीं ना कांहीं काम करायची हौस व पात्रता असते, अथवा उत्पन्न करतां येते आणि त्या कामाला त्याला जुंपलें कीं, तो उत्तम कारागीर ठरतो. 'क्रांतीनंतरच्या रशियांत हा अनुभव फार मोठ्या प्रमाणावर आला. झारच्या अमलाखालील जुलुमास त्रस्त होऊन अथवा स्वदेशांत व्यवसायच नाहीं म्हणून अनेक रशियन माणसें परदेशांत आळसांत काळ कंठीत होतीं. क्रांतीनंतर हीं माणसें रशियांत परत आलीं. झारच्या रशियांत कोणत्याच कामाला न आलेलीं हीं माणसें क्रांतीनंतरच्या सर्व कर्तृत्वास भरपूर वाव असलेल्या वातावरणांत येऊन पडलीं. त्यांपैकीं कोणी आगगाड्यांचे एंजिनियर झाले, कोणी मोठे संघटनकार बनले, कांहींनीं नवे नवे धंदे काढले. आज ज्या रशियन धंदेतज्ज्ञांचीं नांवें जगांत प्रसिद्धि पावलीं आहेत, त्यांत झारच्या अमदानींत निरुपयोगी ठरलेलीं अशीं अनेक माणसें आहेत.' समाजांतील व्यक्तींनीं श्रम करून समाजाच्या संपत्तींत व सुखसोयींत भर टाकल्यावांचून समाजांत समृद्धि होणार नाहीं. सर्व व्यक्तींचें हें कर्तृत्व जितकें उत्साहपूर्ण असेल तितकी समृद्धि अधिक असेल. यासाठीं व्यक्तीच्या ठिकाणीं समाजहितबुद्धि, उत्साह व कार्य-कौशल्य हवें, आळशीपणा अथवा समाजाविषयीं बेफिकीर वृत्ति असतां कामा नये हें खरें, पण आजच्या परिस्थितींत या वैयक्तिक गुणांचा विकास होणें अशक्य झालें आहे. आधीं चोहोंकडे बेकारी इतकी आहे कीं 'काम द्या, काम द्या' म्हणणाऱ्या लोकांची

गर्दी दारोदार उसळली आहे. तेव्हां आळशीपणाचा आरोप आजच्या समाजावर तरी करतां येत नाहीं. कर्तृत्वाची हौस व समाजहितबुद्धि आजच्या समाजांत नाहीं हें खरें आहे, पण त्याचें कारण काय हें पाहिलें पाहिजे. धनोत्पादनसाधनें मूठभर व्यक्तींच्या हातीं असून सर्व समाजाची शेंडी राज्यसंस्था या मूठभर व्यक्तींचे हातीं राहूं देते. यामुळें समाजाचीं नैतिक मूल्यें ठरविण्याचें महत्त्वाचें कार्य या वर्गाचे हातीं आलें आहे. हा पुंजीवाला वर्ग श्रम न करतां संचयावर जगत असल्यानें श्रम करून जगणाऱ्यापेक्षां संचित धनावर ऐदीपणानें जगत राहणें आणि कलाविकासाच्या नांवाखालीं मजा मारणें हें समाजांत श्रेष्ठ दर्जाचें मानलें जाऊं लागलें आहे. असे हे पुंजीवाले व्यक्तिवादी म्हणवून घेऊन समाजाविषयीं बेफिकीर असतात, किंबहुना दरिद्री बहुसंख्य समाजापासून आपल्या धनाचें रक्षण करून तें धन अधिकाधिक सांठवीत जाणें, बिनश्रमानें अथवा कमी श्रमानें अधिकाधिक धनलाभ करून घेण्याची अनैसर्गिक वासना धारण करणें, त्यासाठीं समाजाची पिळणूक करणें व आपल्या जास्तींत जास्त पिढ्यांना ऐदीपणानें चैन करतां येईल इतकें धन सांठविण्याच्या तजविजी करणें हें या पुंजीपतींच्या जीवनाचें सारसर्वस्व असतें. बहुसंख्य समाजापुढें मोठेपणाचा नमुना म्हणून याच पुंजीपतींचीं चित्रें उभीं राहतात. पण बहुसंख्यांची पिळणूक केल्यावांचून थोड्यांना पुंजीपति होणें अशक्य असल्यामुळें सर्व समाज पुंजीपति होऊं शकत नाहीं. आणि या थोड्या पुंजीपतींचें स्वार्थप्रेम, समाजहिताविषयीं बेफिकीरी, ऐदीपणानें राहून व मौजा करून पिढ्यानुपिढ्या संचित धनावर जगण्याची ईर्षा वगैरे दुर्गुण मात्र बहुसंख्य समाजाचे अंगीं जडतात. धनोत्पादनसाधनें खाजगी व्यक्तींचे स्वाधीन असेपर्यंत ही परिस्थिति पालटणार नाहीं आणि राज्यसंस्था जिवंत असेपर्यंत या ना

त्या स्वरूपांत धनोत्पादनसाधनें मूठभर खाजगी व्यक्तींचे हातीं राहणारच.

## स्वभावपालट

राज्यसंस्था नष्ट होतांच धनोत्पादनसाधनें सार्वजनिक मालकींत येऊन हल्लींचा मनुष्यस्वभाव बदलून टाकण्याचा फार मोठा प्रयत्न करण्यांत येईल. धनोत्पादनसाधनें जशीं सर्वांच्या मालकीचीं असावीं, त्याप्रमाणें समाजांतील संपत्ति व सुखसोई एकंदर समाजांतील समर्थ व्यक्तींच्या संकलित श्रमापासूनच निर्माण होऊं शकतील या वस्तुस्थितीची तीव्र जाणीव व्यक्तिमात्रास करून देण्यांत येईल. ज्याचेजवळ पुंजी आहे व जो ऐदीपणानें चैन करतो त्याचा नैतिक दर्जा श्रेष्ठ नसून ज्याच्या श्रमांनीं समाजकल्याण होतें त्याचा नैतिक दर्जा श्रेष्ठ मानण्यांत येऊं लागेल. समाजांत आर्थिक व सामाजिक उच्चनीच भावना पसरविण्यापेक्षां सर्वांनीं बरोबरीच्या नात्यानें वागणें यांतच व्यक्तिमात्राची थोरवी आहे, या भावनेचा प्रसार करण्यांत येईल. परस्पर-साहाय्यावरच समाजजीवन कसें अवलंबून आहे याचें ज्ञान व्यक्तिमात्रास देण्यांत येईल. असें झालें म्हणजे एका जहाजांत बसलेल्या अनेक व्यक्तींना जहाज सुरक्षित राहण्यांतच सर्वांचें कसें हित आहे आणि कोणाही एकाच्या अप-कृत्यानें जहाजावर संकट ओढवूं शकेल यासाठीं प्रत्येकानें जहाजाच्या रक्षणार्थ कसें झटलें पाहिजे हें जसें उत्तम प्रकारें पटलेलें असतें व प्रत्येकाचे आचरणांत हें सामुदायिक ममत्व उठावदारपणें व्यक्त होत असतें, तसेंच तें समाजजीवनांतहि व्यक्त होऊं लागेल. सारांश, अराज्यवाद हा सगळी मानवी संस्कृति सुधारण्याचा फार मोठा मार्ग आहे.

पण माणसांना स्वभावतः श्रमच करायला नको असतात तेव्हां

श्रम करण्याची राजकीय व सामाजिक सक्ती नाहींशी झाल्यास कोणी श्रमच करणार नाहीं असा एक आक्षेप नेहमीं घेण्यांत येत असतो; हा आक्षेप अगदींच फोल आहे. शारीरिक हालचालीची हौस— नव्हे वेड प्रत्येक प्राणिमात्रास अगदींच जन्मसिद्ध आहे. स्वतांच्या श्रमानें व कौशल्यानें कांहीं तरी नवीन निर्माण करण्याची इच्छा अगदीं लहान लहान मुलांतही दिसून येते. शरीराची जोमानें आणि सहेतुक हालचाल केल्यावांचून मुलांना कधींही स्वस्थता वाटत नाहीं. अगदीं सतत, शरीर झोपेनें गळून पडेपर्यंत कोणत्याही आड-काठीस न जुमानतां मुलें यातायात करीत असतात. जितकीं मुलें अधिक निरोगी तितका हा गुण जास्त असतो आणि उलट हा गुण जितका अधिक तितकीं मुलें अधिक निरोगी असतात व होतात. निरोगी अशा मोठ्या माणसांनाही हा नियम लागू आहे. त्यांच्या शरीरांतील ऊर्मि व्यक्त करण्योसाठीं ते धडपडत असतात. माझ्या आवडीचें काम मला द्या, तें करण्यानें मी माझ्या आणि समाजाच्या कल्याणास मदत करता अशी जाणीव माझ्या ठिकाणीं उत्पन्न होऊं द्या, म्हणजे मग चुकारपणा, कंटाळा कीं शीण कसा तो माझ्या ठिकाणीं तुम्हांला दिसणारच नाहीं. कारखान्यांत अथवा कचेरींत अतिशय कष्ट करून थकलेला मजूर अथवा अधिकारी घरीं आल्यावर हौसेचें काम जेव्हां हातीं घेतो तेव्हां कारखान्यांत अथवा कचेरींत केलेल्या कष्टापेक्षांही अधिक कष्ट अधिक उत्सुकतेनें व हौसेनें करतो हा सार्वत्रिक अनुभव आहे. कोणी आपल्या बागेंत काम करतो तर कोणी तत्त्वज्ञानाचा व्यासंग करतो, तर कोणी समाजविषयक प्रश्नांचा अभ्यास करतो आणि कारखान्यांतल्या अथवा कचेरींतल्या सक्तीच्या श्रमापेक्षां या खाजगी व हौसेच्या यातायातींनींच तो अधिक आत्म-विकास करीत राहून त्याच्या या हौसेच्या श्रमानें समाजाचाही

फार फायदा होतो. "राज्यहीन समाजव्यवस्थेंत प्रत्येकाला त्याच्या त्याच्या नैसर्गिक कलाप्रमाणें आणि आवडीप्रमाणें आपलें काम निवडण्याची संधि मिळेल. यामुळें आज श्रम करणें म्हणजे नरकवास वाटतो तसा तो न वाटतां श्रम करणें ही मौजेची;हौसेची बाब होईल. आळस औषधालाही मिळणार नाहीं. आणि आस्थेनें व प्रेमानें निर्माण केलेल्या वस्तु सुंदर व आनंददायक होतील."

खेळ खेळण्याचे श्रम आनंददायक वाटले तरी समाजोपयोगी व धनोत्पादक असे श्रम आनंददायक होतील ही गोष्ट आजच्या समाजव्यवस्थेंत पटूं शकतच नाहीं. पण ऐच्छिक कर्तव्यनिष्ठेवर समाजाची उभारणी केल्यास कोणतेही उपयुक्त श्रम निरनिराळ्या उपायांनीं आकर्षक करतां येतील. आजच्या परिस्थितींत श्रम हे अप्रिय वाटतात यास अनेक कारणें आहेत. काम मिळतें त्यांना अगदीं थोड्या मोबदल्यांत थकेपर्यंत काम करावें लागतें. पुष्कळदां तें मोठें जिकिरीचें असतें; पण हा थकवा अथवा ही जिकीर टाळतां येणार नाहीं असें नाहीं. सर्वांना सारखाच धनोपभोग मिळाला पाहिजे असें म्हटलेंच; पण कामांत विषमता ठेवणें शक्य आहे. आजच्या परिस्थितींत विशेष कौशल्य अथवा विशेष विद्या ज्या कामाला लागेल त्या कामाला वेतन जास्त देण्यांत येतें; पण हें योग्य नाहीं. विशेष विद्या अथवा विशेष कौशल्य ज्यांनीं करावयाचें जें काम, तें करणाऱ्याला एक प्रकारचा बौद्धिक कर्तृत्वाचा आनंद होतच असतो. अर्थात् अशा श्रमांना अधिक वेतनानें उत्तेजन देण्याची जरूरी कां वाटावी? कौशल्य अथवा विद्या शिकण्याचे श्रम व त्याचा खर्च या माणसांना सोसावे लागतात हें खरें. पण शिक्षणाचा खर्च जर समाजानें सोसण्याचें ठरविलें तर शिकून तज्ज्ञ झालेल्याला अधिक पगार कां द्यावा? आज खर्च परवडत नाहीं म्हणून मूळच्या

बुद्धिवान् अथवा कुशल अशा ज्या कित्येकांना शिक्षण मिळूं शकत नाहीं त्यांना शिक्षण मोफत झाल्यास तें घेतां येईल, व यांना शिक्षणाचें आकर्षण आपोआपच असल्यानें समाजाला हवीं इतकीं कुशल व बुद्धिवान् माणसें समाजसेवेला नेहमीं पुरेशीं मिळत राहतील.

खरी अडचण आहे ती गटारें साफ करणें, संडास धुणें, असल्या घाणेरड्या कामांची. हीं कामेंही निरनिराळ्या यांत्रिक साधनांनीं आकर्षक करतां येतीलच. पण हीं अथवा इतर जीं कांहीं किळसवाणीं कामें आज आहेत व पुढेंही राहतील त्या कामांना आज फार थोडें, अगदीं भिकारडें वेतन मिळतें. रूढीनें आणि बेकारीच्या भीतीनें हीं कामें करण्यास आजही माणसें मिळूं शकतात हें खरें. पण रूढीचें बंधन अथवा दडपण आणि बेकारीची भीति नष्ट झाल्यावर या किळसवाण्या कामासाठीं कांहीं तरी विशेष आकर्षण निर्माण करावेंच लागेल. हें आकर्षण कामाचे तास कमी करून देतां येईल. ज्यांना समाजसेवेचें विशेष वेड आहे आणि ज्यांना समाजसेवेस वेळ थोडा खर्चून हौसेच्या कार्यांत अथवा आवडीच्या बौद्धिक व्यासंगांत अधिक वेळ घालवावासा वाटेल अशीं माणसें समाजाच्या सेवेस अवश्य अशीं घाणेरडीं कामें करण्यास स्वेच्छेनें पुढें येतील. शिवाय आजच्या समाजांत घाणेरडें काम हें हीन दर्जाचें मानलें जातें. पण समाजाच्या उन्नतीस सर्व प्रकारचींच कामें अवश्य असून अमुक काम श्रेष्ठ अथवा अमुक हीन हा फरक नाहींसा झाला म्हणजे आज किळसवाण्या कामाबद्दल प्रतिकूलता असण्याचें जें एक प्रमुख कारण आहे तें नाहींसें होईल. केवळ मिळकत मोठी म्हणून काम श्रेष्ठ असें मानण्याची आजची रूढि मिळकत सर्वांचीच समान झाल्यावर राहणार नाहीं.

## पण बेकारी येईल ना ?

पण आजच्या समाजांत असलेलें एक फार मोठें संकट पूर्ण राज्यहीन अशा समाजांत आणखीही अधिक दुर्धर होण्याचा संभव आहे अशी एक शंका येते. तें म्हणजे बेकारीचें होय. राज्यसंस्थाच नष्ट झाली म्हणजे आजचे किती तरी व्यवसाय अगदीं थंडगार पडतील. सैन्यें, लढाऊ आरमारें आणि लढाऊ वैमानिक दळें यांतील नोकर व अधिकारी वर्ग बेकार होईल. या संस्थांना लागणारें अफाट साहित्य– शस्त्रास्त्रें, किल्ले, दारूगोळा, शहाजें, विमानें बांधण्याचे कारखाने बंद होऊन लाखों मजूर बेकार होतील. अशा प्रकारें कोट्यवधि माणसें बेकार होऊन बेकारीचा आजचा प्रश्न अधिकच जिकिरीचा होणार नाहीं का? समाजव्यवस्थेबद्दलच्या अधिक विकृत अशा आजच्या रूढ कल्पनेमुळें ही शंका उद्भवते. आजच्या समाजांत जिला वेतन मिळेल अशी कोणतीही रोजगारी मानाची समजली जाते. गरीब व अज्ञान रयतेला अन्यायानें आणि लबाडीनें पिळणाऱ्या सावकाराची बाकी वसूल करण्याचें काम करणारा नोकर हा समाजांत मानानें जगूं शकतो. पण खरोखर वेतन देणारें कोणतेंही काम जर मानाचें, तर दरोडेखोरांच्या टोळींत नोकरी करणें हें कां मानाचें नसावें? आणि अशा प्रकारें आजच्या जगांतील बेकारी जर नष्ट करावयाची असेल, तर बेकारांनीं दरोडे घालण्याच्या कंपन्या काढाव्या आणि सरकारनें त्यांना ठराविक मर्यादेपर्यंत दरोडे घालण्याचे परवाने द्यावेत म्हणजे झालें. आजचीं सैन्यें, आरमारें व विमानदळें या दरोडे घालणाऱ्या मंडळ्याच नव्हेत तर काय आहेत? एक राष्ट्र दुसऱ्या राष्ट्रावर झडप घालूं पाहत असतें; आणि हें दुसरें राष्ट्र पहिल्या राष्ट्रापासून आपलें रक्षण करण्यासाठीं जें सैन्य उभारतें त्याच्या साह्यानें स्वतां तिसऱ्या एका राष्ट्राच्या स्वातंत्र्याचें

अपहरण करतें. देशांतल्या देशांत शांतता व सुव्यवस्था राखणारे सैनिक आणि पोलिस हे तरी दरोडेखोरींचेंच काम करतात, नाहीं का? धनोत्पादन-साधनें खाजगी मालकींत असल्यानें या मालकांचे हातीं धनसंचय होत असतो. त्याबरोबर समाजांत दारिद्र्य आणि बेकारी माजत असते. समाजांत उत्पन्न झालेल्या धनाचा उपभोग घेणें हा समाजाचा हक्क असतो. पण बहुसंख्य समाजास हें भोग्य धन मिळूं न देतां धनोत्पादन-साधनांचे मालक तें धन आपल्याच मालकींत ठेवितात, ही अराज्यवाद्यांच्या मतें चोरीच होय. या धनिकांच्या धनाचें रक्षण करणें एवढेंच काम पोलिस अथवा राज्य-संस्था करीत असते. गरीबांच्या धनाचें रक्षण करण्याची जरूरीच नसते; कारण त्यांचेजवळ धन नसतेंच. सारांश, सैन्य, आरमार, विमानें, पोलीस वगैरे सर्व खातीं व त्यांना साहाय्य करणाऱ्या संस्था या धनोत्पादनाचे कामीं मुळींच मदत करीत नसून, 'दरोडेखोरासच' मदत करतात. तेव्हां या सर्व संस्था रद्द झाल्यास दरोडेखोरी बंद होईल इतकाच याचा अर्थ.

पण हे सर्व लोक बेकार होतील त्याची काय वाट? बेकारीचें संकटही आजच्या दुष्ट समाजरचनेमुळेंच विशेष तीव्र भासतें व टिकून राहतें. सर्व रोजगारीचा अथवा श्रमाचा उपयोग आज मुख्यतः नफा मिळविण्यासाठीं धनोत्पादन करण्याकडे होतो. कामाचे तास वाढवून अथवा कामाचा वेग वाढवून जास्तींत जास्त धन थोड्यांत थोड्या वेतनांत निर्मून घेण्याची महत्त्वाकांक्षा मालकवर्ग धरतो. सगळ्या जगभर हाच प्रकार चालू राहतो. यामुळें होतें काय कीं, जगांत श्रमजीवी वर्गास वेतन कमी वाटलें जातें व त्या मानानें जगभर बाजारांत माल अधिक येऊन पडल्यानें वेतनाच्या प्रमाणांतच माल खपून बाकीचा पडून राहतो. हा पडून राहिलेला माल न

खपल्यानें नवीन निर्माण करण्यांत येत नाहीं आणि रोजगारी कमी होऊन बेकारी वाढते. याप्रमाणें कमींत कमी वेतनांत जास्तींत जास्त माल निर्माण करण्याची महत्त्वाकांक्षा मालकवर्ग धारण करील तोंवर या चक्रव्यूहांतून सुटण्यास दुसरा मार्गच नाहीं. पण मालकशाही आणि त्याबरोबरच राज्यसंस्था नाहींशी झाली म्हणजे काय होईल? मालकांना नफा मिळणें हें उत्पादनाचें ध्येयच राहणार नाहीं. समाजाला धन लागतें किती याचा विचार होईल, व तें निर्माण करण्यांत सर्व समर्थ माणसांना भाग घ्यावा लागेल. आणि कोणासच जास्तींत जास्त तास काम करावें न लागतां सर्वांचे कामाचे तास कमी होतील. हल्लीं शास्त्रीय व यांत्रिक साधनांनीं उत्पादनाचा वेग इतका वाढला आहे कीं, जगांतील सर्व समर्थ स्त्री-पुरुष उत्पादक श्रम करूं लागल्यास प्रत्येकास दररोज साधारणत: तीन तास काम करावें लागेल व आजच्या विद्यमान् लोकसंख्येचा योगक्षेम तेवढ्यानें उत्तम चालेल असें गणित कांहीं शास्त्रज्ञांनीं केलें आहे. सैन्यें व आरमारें रद्द होऊन लक्षावधि, कोट्यवधि लोक बेकार झाले तर त्यामुळें कोणत्याही प्रकारचें संकट ओढवणार नसून आज उत्पादक श्रम करणाऱ्यांना जें मरेमरेतोंवर राबावें लागतें तें बंद होईल व सर्वांचे कामाचे तास कमी होतील.

## सर्वांस समान स्वातंत्र्य

पण राज्यहीन अशा समाजांत सर्वत्र जी समता होणार ती चोपण्यानें जमीन बडवून सपाट करावी अथवा रुळानें रस्ता सारखा करावा अशी ती समता असेल का? तसें होईल तर माणसांची वसाहत म्हणजे गुरांचा कोंडवाडा अथवा गुन्हेगारांचा तुरुंगच ठरेल. सर्वांच्या गरजा, आवडीनिवडी मुळींच सारख्या नसतात. अशा

स्थितींत सर्वत्र समता स्थापण्याचा प्रयत्न करणें अंगभूत जोमानें फोफावून वाढणाऱ्या रोपट्यांना, खुरटलेल्या रोपट्यांच्या पंक्तींत नेऊन बसविण्यासारखें आहे. अशी समता मानवी उन्नतीस कशी उपकारक ठरेल ? हा आक्षेपही अराज्यवादाच्या अपूर्ण कल्पनेमुळेंच उत्पन्न होतो. राज्यहीन समाजांत सर्वांना सारखा धनोपभोग मिळेल खरा पण व्यक्तिमात्राच्या गरजांची भिन्नता व विषमता अवश्य लक्षांत घेतली जाईल व त्यासाठीं पगाराव्यतिरिक्त किती तरी वस्तु समाजामार्फत व्यक्तिमात्रास मोफत अथवा एकाच दरानें वाटेल तितक्या प्रमाणांत वापरण्यास मिळतील. आजच्या जगांतही सडकांचा, सार्वजनिक बागांचा, मोफत दवाखान्यांचा, उपयोग सर्वसामान्य माणसांना अगदीं मोफत मिळतो. पाणी वगैरे पदार्थ एक ठराविक दर दिला असतां कांहीं मर्यादेपर्यंत गरजेप्रमाणें कमी अधिक वापरण्यास मिळतातच. खानावळींत अमुक इतके पैसे दिले म्हणजे एकवेळीं जेवतांना प्रत्येकास कितीही जेवतां येतें. राज्यहीन समाजांत ही प्रथा पुष्कळच अधिक प्रमाणांत रूढ होईल. प्रत्येकास उन्नति करून घेण्यास जास्तींत जास्त जेवढी संधि देतां येईल तेवढी देण्यांत येईल. जड बुद्धीच्या मुलास शिक्षण देण्यांत अधिक कसोशी केली जाईल. रोगग्रस्ताकडे निरोगी माणसापेक्षां समाज अधिक लक्ष पुरवील. अधिक समर्थ असतील ते समाजाची अधिक सेवा करतील. आणि यासाठीं सक्तीची गरज राहणार नसून सामुदायिक हितबुद्धीनेंच जो तो ही सर्व मेहनत करील. ज्याची जेवढी कुवत तेवढी त्यानें समाजसेवा करावी व ज्याची जेवढी गरज तेवढा त्यानें सामाजिक धनाचा व सेवेचा उपभोग घ्यावा हें या राज्यहीन समाजांतील समतेचें स्वरूप असेल. ही समता स्वातंत्र्याचे बाबतींत असेल; म्हणजे 'चाहे सो करो' असें सर्वांना पूर्ण स्वातंत्र्य मिळेल.

## नव्या मानव्याचा उदय

यामुळें बेबंदशाही व अव्यवस्था माजेल हा समज अराज्यवाद्यांना मुळींच पटत नाहीं. गेल्या हजारों वर्षांत निर्बंध नसून अथवा निर्बंधास झुगारून मानवसमाजानें जें वर्तन केलें त्यानेंच, अराज्यवाद्यांच्या मतें, मानवसमाजाची प्रगति झाली आहे. ख्रिस्त, बुद्ध, लूथर यांसारखें धर्मपुढारी, सॉक्रेटिस, गॅलीलिओ, न्यूटन यांसारखे विचारवंत व शास्त्रज्ञ यांनीं त्या त्या काळच्या निर्बंधांस व सामाजिक अंधरूढींस झुगारून जीं तत्त्वें प्रतिपादिलीं त्यांनींच समाज पुढें चालला आहे हें आज आपण मान्य करतों व त्यांच्या काळीं त्यांचा अत्यंत छळ झाला असतांही आपण त्यांचा आज गौरव करतों. आपणही आज स्वतंत्रपणें व निर्बंधांस झुगारून नवीं तत्त्वें प्रतिपादणाऱ्यांचा छळ करतों. पण यांचीं तत्त्वेंही उद्यां, कदाचित् आपल्या डोळ्यांदेखतही, जगद्वंद्य होतील व आपणांस त्यांपुढें मान तुकवावी लागेल हें आपणांस माहीत आहे. कायद्यानें अथवा लोकरूढीनें मानवजातीच्या इतिहासांत व्यक्तिस्वातंत्र्यास फार थोडा वाव दिला असतांही स्वातंत्र्याचा हक्क व हट्ट गाजवून आजवर हजारों वीर व कर्तबगार पुरुषांनीं आपली कीर्ति अजरामर करून ठेविली आहे. ज्यांना अशी कीर्ति मिळाली नाहीं तरी पण ज्यांनीं वीरत्व गाजविलें असेही असंख्य झाले, आणि स्वातंत्र्य नसल्यानें ज्यांच्या कर्तृत्वाचा अंकुर आंतल्या आंत भाजून—करपून नष्ट झाला अशांची संख्या तर अफाटच असेल. जवळजवळ प्रत्येक मानवी बुद्धींत अथवा अंतःकरणांत कांहीं तरी विशेष कर्तृत्वाचा अथवा भावनेचा गुण असतो. भौतिक परिस्थितीची अनुकूलता, स्नेहाचें व सलोख्याचें वातावरण, समाजहितबुद्धि व पूर्ण स्वातंत्र्य आणि व्यक्तिविकासास पूर्ण वाव या गोष्टी सर्वांना उपलब्ध झाल्यास माणसाचें बौद्धिक,

मानसिक व शारीरिक कर्तृत्व सर्व बाजूंनीं अनुकूलता मिळालेल्या वेलीप्रमाणें फोंफावूं लागेल. फूल उत्तम प्रकारें उमलावें त्याप्रमाणें व्यक्तिमात्राच्या उत्तम गुणांचा विकास त्या परिस्थितींत होऊं शकेल. "पूर्ण राज्यहीन समाजांत माणसाचीं राजकीय व सामाजिक बंधनें तेवढींच तुटतील असें नव्हे. ती केवळ पहिली पायरी होय. माणसाचें व्यक्तित्व व मन यांवर या स्वातंत्र्याचा विलक्षण परिणाम होईल. एकाच्या इच्छेची सत्ती दुसऱ्यावर व्हावयाची नाहीं असें एकदां ठरलें म्हणजे सत्तेचें भय नष्ट होऊन नैतिक जुलूमही थांबेल. माणसाचा आत्मा मुक्तसंचारी होईल. आणि या मानसिक स्वातंत्र्यांत एक नवें मानव्य, एक अगदींच नवी संस्कृति निर्माण होईल. विधिनिषेध नाहींसे होऊन प्रत्येकास आपला स्वतंत्रपणें विकास करतां येईल. ज्याला त्याला आपला नैसर्गिक कल जिकडे असेल तिकडे वळण घेतां येईल. 'तूं हें कर आणि, तूं तें करूं नको' असें कोणीही कोणास सांगणार नाहीं. 'तुला हवें तें कर, परिणामाचा मात्र पूर्ण विचार कर' असेंच समाज व्यक्तिमात्रास म्हणेल. स्वावलंबन, अब्रूदारपणा वगैरेचें शिक्षण या योगेंच उत्तम मिळून तें घरांत व शाळेंत अगदीं लहानपणापासून मिळूं लागेल. यामुळें जीविताबद्दल नवीच कल्पना धारण करणारा अगदीं एक नवा मानववंशच जगांत निर्माण होईल. भावी कालांतील माणसाला आपलें जीवन अगदीं एका नव्याच पातळीवर आलें असल्याचा अनुभव येईल. जीवन ही एक कला आहे व तो सर्वांगीण आनंद आहे असें त्याला दिसेल. आज जीवन हें एक एकमेकांना कोपरखळ्या देऊन पुढें धांवण्याची शर्यत असल्याचें स्वरूप जीवनाला आलें आहे. तसें तें राज्यहीन समाजांत राहणार नाहीं. आवश्यक कामापेक्षां फुरसतीचा काळ हा व्यक्तिविकासाच्या दृष्टीनें माणसाला

फार महत्त्वाचा वाटेल. अधिकाधिक सांस्कृतिक उत्कर्ष करून घेणें, सृष्टींतील गूढ सिद्धांतांचा शोध लावणें आणि जगांतील अधिकाधिक उच्चतर सत्याचा शोध लावीत राहणें हेंच जीवन कार्य होईल. मनाच्या अमर्याद शक्तींचा उपयोग करण्यास, ज्ञानाचें प्रेम व्यक्त करण्यास, आपली संशोधक बुद्धि वापरण्यास, आणि कल्पनेच्या पंखांवर भरारी मारण्यास आपणांस पूर्ण स्वातंत्र्य आहे हें माणसाच्या प्रत्ययास येईल. मानवतेच्या पूर्ण विकासाप्रत मनुष्य पोंचूं शकेल. त्याच्या व्यक्तिवैशिष्ट्यानुसार तो विकासत जाईल. एकसारखेपणाचा त्यास कंटाळा व तिरस्कार वाटूं लागेल. मानवजातींत दिसून येणारी विविधता हीच त्यास समाधानकारक वाटून तीच जीवनाचें खरें वैभव आहे अशी त्यास खात्री पटेल.

" 'असा दिवस अजून किती तरी दूर आहे ?' असें तुम्ही म्हणाल. 'हा दिवस सत्यसृष्टींत कसा आणायचा ?' अशी शंका तुम्हांला येईल. खरेंच, हा दिवस फारच फार दूर असेल. पण कदाचित् दूर नसेलही, कुणीं सांगावें ? पण कांहीं झालें तरी जर योग्य मार्गावरूनच आपणांस चालावयाचें असेल तर हें अंतिम ध्येय आपल्या दृष्टीसमोर ठेवून त्याच दिशेनें आपण मार्गक्रमण करीत राहिलें पाहिजे. वर सांगितलेला पालट एका रात्रींत अकस्मात् घडून येईल असें नाहीं. निसर्गांत अथवा मानवी जीवनांत सर्व पालट हळूहळूच घडून येत असतात. पण अशी राज्यहीन, स्वातंत्र्यपूर्ण समाजव्यवस्था हाच मानवजातीचा अपरिहार्य विकास होय ही आपण खूणगांठ बांधली पाहिजे. अपरिहार्य असें म्हणण्याचें कारण मानवजातीचा विकास याच दिशेनें होत आला आहे. त्यांत नागमोडी वळणें अनेक झालीं आहेत. पुष्कळदां माणसाची पायाखालची

वाट नाहींशी झाली आहे. तरी पण कालांतरानें मनुष्य पुनः आपल्या वाटेनें चालूं लागला आहे."

---

## ऐतिहासिक विकासक्रम : : : ५

राज्यहीन समाजाचें स्थूल स्वरूप कसें असेल हें कळलें. पण अशी समाजव्यवस्था कशी निर्माण होईल. तीसाठीं कोणते प्रयत्न केले पाहि-जेत हा प्रश्न अतिशय महत्त्वाचा आहे. जग आज कोट्यवधि वर्षांचें जुनें असून मानवसमाजही लक्षावधि वर्षें विकसत आला आहे. या विकासांत मानवव्यक्ति व मानवसमाज यांचें विकासासंबंधींचे कांहीं विशिष्ट गुणदोष प्रकट झाले आहेत. हा सर्व ऐतिहासिक विकास-क्रमाचा अनुभव जमेस धरूनच राज्यहीन समाजव्यवस्था ज़गांत निर्माण कशी करतां येईल व माणसानें तीसंबंधानें काय करावें याचा विचार करतां येईल. म्हणून आराज्यवाद्यांच्या मतें या विकासक्रमाचें स्वरूप काय हें येथें समजून घेऊं.

### कलह हेंच इतिहासाचें सार ?

स्थूल दृष्टीनें पाहिलें तर माणसालाच काय पण अखिलप्राणिमात्राला जीवनासाठीं अहर्निश सृष्टीशीं व इतर प्राणिमात्राशीं झगडावें लागतें असें इतिहास सांगतो. ज्वालामुखींनीं, सापविंचवांनीं, व्याघ्रसिंहांनीं नद्यांनीं, सागरांनीं, विषारी वेलींनीं भरलेल्या या जगांत कित्येक लक्ष वर्षें जीवजंतूंनीं जगण्यासाठीं सृष्टीशीं सतत झगडा केला, त्यासाठीं जीवांना नवीं नवीं इंद्रियें व सोयीही त्यांच्या शरिरावर उत्पन्न झाल्या.

प्राण्यांना सृष्टीशीं झगडतांना इतर प्राण्यांशींही झगडावें लागलें. वाघ-सिंहांना, साप-विंचवांना एकमेकांचें व सृष्टीचेंही भय होतें. गाई, म्हशी, हरणें यांना सृष्टीचें, वाघ-सिंहाचें आणि साप-विंचवांचें भय होतें. या झगड्यांत जे समर्थ तेच टिकले इतर खलास झाले. लहान माशांना मोठ्यांनीं खाऊन टाकलें. व्याघ्र-सिंहांनीं गाई-म्हशी-हरणें यांना खाल्लें. सर्व प्राणिसृष्टींत श्रेष्ठ गणला गेलेला माणूसही असाच वागत आला आहे. पोट भरण्यासाठी माणसें माणसांना खात असतच. पुढें इतर प्राण्यांचें मांस अधिक चांगलें असें वाटून माणसांनीं माणसास खाण्याची प्रथा बंद केली. धान्य, फळें वगैरे वनस्पति माणसांच्या खाण्यांत येऊं लागल्या. पशूंना खाण्यापेक्षां त्यांचें दूध सेवन करणें, शेतीच्या कामीं त्यांना वापरणें ही प्रथा सुरू झाली. तथापि माणसानें जनावरांनाच नव्हे तर माणसानें माणसालाही गुलाम करण्याची प्रथा सुरू झाली. पुढें गुलामगिरी नष्ट झाली तरी राजांचा, सरदारांचा जुलूम जनतेवर चालू राहिलाच. मजुरांची पिळणूक भांडवलवाल्यांनीं चालू ठेविली, पूर्वीं व्यक्तीव्यक्तींचे झगडे चालत, ते आतां राष्ट्राराष्ट्रांचे चालले आहेत व पूर्वींच्या कोणत्याही झगड्यांपेक्षां हल्लींचे झगडे अधिक क्रूर अधिक भयानक झाले आहेत. मिळून कलह हा सृष्टीचा जो अनादि सिद्धांत तो अधिकाधिक भयानक स्वरूप धारण करीत आहे. आणि अराज्यवाद्यांना तर कलहहीन व प्रेम आणि सहकार्य यांवर आधारलेली समाजव्यवस्था स्थापावयाची आहे. तेव्हां अनादिकालापासून चालत आलेला सृष्टीचा हा क्रम तरी अराज्यवाद्यांना अनुकूल आहे असें सकृद्दर्शनीं वाटत नाहीं. हजारों वर्षें चालत आलेला सृष्टिक्रम जर अराज्यवाद्यांना याप्रमाणें प्रतिकूल आहे असें सिद्ध होत असलें तर अराज्यवाद्यांच्या महत्त्वाकांक्षेस तो दुर्लंघ्य अडथळाच होय हें कबूल करावें लागेल. कारण

प्रेम आणि सहकार्य हें गुणच जर सृष्टींत नसले, मोठ्या माशानें लहान माशास खावें हा 'मात्स्यन्याय'च मानवी सृष्टींतही प्रतीत होत असला, तर मानवी सृष्टींत कधींच अनुभवास न आलेले प्रेम व सहकार्य हे गुण अराज्यवाद्यांना मानवी सृष्टींत कसे उत्पन्न करतां येणार ? आडांतच नाहीं तें पाणी पोहऱ्यांत यावें ही इच्छा कधीं तरी पूर्ण होणें शक्य आहे काय ?

## प्रेम व सहकार हेंच विकासाचें सार

पण, अराज्यवाद्यांचे मतें, आजवरच्या मानवजातीच्या इतिहासासंबंधानें असा निराशावाद स्वीकारण्याचें मुळींच कारण नाहीं. वर उल्लेखिल्याप्रमाणें मानवजातीच्या इतिहासांत 'मात्स्यन्याय'च प्रभावी दिसतो तो केवळ वरवर निरीक्षण केल्याचा परिणाम होय. गडगडणारे ढग, कडाडणाऱ्या विजा आणि सर्वभक्षक ज्वालामुखी व धरणीकंप हीं ज़गाचें लक्ष ठळकपणें वेधून घेतात. पण जग कांहीं केवळ यांनींच घडविलेलें नाहीं. हळूहळू व पुष्कळ वेळ पडणाऱ्या पावसानें धरणीचें शांतवन केलें आहे. झुळझुळू वाहणाऱ्या ओढ्यांनीं मोठमोठ्या नद्यांना जन्म देऊन पृथ्वीस जीवनाचा सर्वत्र पुरवठा केला. शेतकऱ्यांनीं नाजूक हातांनीं धरणीची मशागत करून तिला धनधान्यसंपन्न केलें. या शांत कर्तृत्वानेंच आजच्या जगाची खरी उभारणी झाली आहे. मानवी जीवनांत लढाया, मारामाऱ्या, द्वेष, मत्सर, विध्वंस यांचा गडगडाट सर्व इतिहासांत ऐकूं येत असला, तर इतिहासांत फारसा मोठा आवाज न करतां प्रेम, औदार्य, सामुदायिक कर्तृत्व व सामुदायिक जीवनाचा अहंकार यांनीं केलेलें कर्तृत्व फार मोठें आहे. किंबहुना या जगांत यांचें कर्तृत्व कमी होत नसून वाढत आलें आहे. अखिल मानवजातींतील व्यक्तिमात्र कित्येक वर्षेपर्यंत

आईबापांच्या, नातलगांच्या प्रेमाच्या पंखांखालीं पोसली गेली आहे. खेडींच्या खेडीं, अनेक खेड्यांचे प्रांत, अनेक प्रांतांचीं राष्ट्रें, हीं सामुदायिक जीवनाच्या अहंकारांतच जन्म पावलीं. मोठमोठ्या इमारती, कालवे, पाटबंधारे, आगगाड्या, आगबोटी, छापखाने वगैरे मानवी जीवनाचें वैभव वाढविणारा प्रचंड पसारा सामुदायिक अहंकार व सामुदायिक कर्तृत्व यांचेंच फल आहे. फार काय, राष्ट्रा-राष्ट्रांतील लहान-मोठीं युद्धें हीं या सामुदायिक सद्भावनेचेच पुरावे आहेत. जर्मनी इंग्लंडशीं लढण्यास सिद्ध होत आहे हें अत्यंत घातुक तर खरेंच; फॅसिस्ट राज्यव्यवस्था व समाजव्यवस्था वाईट हेंही खरें. पण आठ कोटि जर्मन लोक एकमेकांचा वैरभाव विसरून सामुदायिक बंधुभावानें व सामुदायिक कर्तृत्वानें जगूं लागले हा मानवजातीचा मोठा विजय होय. व्यक्ति-व्यक्ति, खेडीं-खेडीं, प्रांत-प्रांत यापूर्वी आपसांत लढत. यामुळें 'राष्ट्रैक्य' हीं भावना निर्माण होणें कधींच शक्य झालें नाहीं. आतां हीं लहान व अंतर्गत भांडणें लुप्त होऊन जहाजावरील उतारूंप्रमाणें एका राष्ट्रांतील नागरिकांत आपण सर्व 'एक' आहों ही भावना जन्म पावली. ही मानव-जातीची फार मोठी प्रगति होय. मराठ्यांना महाराष्ट्र, गुजराथ्यांना गुजराथ, बंगाल्यांना बंगाल हेच स्वदेश वाटत. हे प्रांत आपसांत प्राण-घातक युद्धें खेळत. आतां हें द्वंद्व नाहींसें होऊन हिंदुस्थान या एका राष्ट्राचे आपण सर्व नागरिक आहों ही जाणीव सर्व प्रांतीयांना होऊं लागली ही मानवी जीवनाची फार मोठी प्रगति होय. प्रांताप्रांतांतलें द्वंद्व नाहींसें होऊन 'राष्ट्रैक्य' ज्या क्रमानें निर्माण झालें त्याच क्रमानें राष्ट्राराष्ट्रांतलें द्वंद्व नाहींसें होऊन जागतिक ऐक्य निर्माण होऊं घातलें आहे. राष्ट्रसंघ हें फार मोठें ढोंग आहे हें निःसंशय खरें. पण ढोंगी मुत्सद्द्यांनीं हें ढोंग सुखासुखी निर्माण केलें नाहीं. जागतिक

ऐक्य घडविण्याचा इतिहासाचा जो अपरिहार्य क्रम तोच या मुत्सद्द्यांना राष्ट्रसंघ बनविण्याकडे खेचता झाला आहे. त्यांतली मूलभूत कल्पना आतां अमर झाली आहे. याच क्रमानें ढोंगी मुत्सद्दी हाकलले जाऊन सज्जनांच्या हातीं ही संस्था जाईल. प्रांताप्रांतांतलीं युद्धें हीं जशीं अनिष्ट म्हणून मागें पडलीं त्याचप्रमाणें राष्ट्राराष्ट्रांतलीं युद्धेंही अनिष्ट म्हणून मागें पडून त्यांची जागा राष्ट्रसंघाच्या रूपानें जागतिक ऐक्य व जागतिक बंधुभाव यांना मिळेल यांत मुळींच संशय नाहीं. बॉंबगोळ्यांच्या आणि तोफांच्या गडगडाटांत व प्रतिक्षणीं सर्वच्या सर्व मानवी संस्कृति भस्मसात् होण्याच्या भीतींतही इतिहासाचा हा क्रम अपरिहार्य आहे असें सूक्ष्मपणें पाहणारास पटूं शकतें. आणि हा क्रम पार पडण्याचा वेगही इतका वाढला असल्याचें गेल्या दोनशें वर्षांच्या इतिहासावरून दिसतें कीं, कदाचित् चालू शतकांतही पूर्ण राज्यहीन, शांततामय व प्रेममय समाजव्यवस्था जगांत निर्माण झालेली पाहण्याचें भाग्य मानवजातीला लाभेल असें अराज्यवाद्यांना वाटतें.

## क्रांतीनेंच प्रगति झाली

अर्थात् इतिहासांत आजवर घडून आलेली क्रांतिकारक प्रगति शांतपणें घडून आलेली नाहीं व पुढेंही ती शांतपणें घडून येणें मुष्किल आहे. जड सृष्टींत, जीव-सृष्टींत अथवा मनुष्य-सृष्टींत एका अवस्थेचा नाश होऊन तेथें दुसरी अवस्था निर्माण होते व तिसरी अवस्था निर्माण होण्यापूर्वी दुसऱ्या अवस्थेचा विध्वंस व्हावा लागतो अथवा करावा लागतो. बीजांतून वृक्षाचा उद्भव व्हावयाचा असल्यास पृथ्वीच्या ओल्या उबाऱ्यांत बीजाला गुदमरवून त्याचा प्राण घ्यावा लागतो. अनेक प्राण्यांचें व वनस्पतींचें खत व अन्न बनवून

व तें खाऊनच नवीन वनस्पति व प्राणी उत्पन्न होतात. द्रवरूप व मृदु असलेली पृथ्वी हळूहळू घनरूप होऊन तिच्या पृष्ठावर मोठमोठे खडक उत्पन्न होतात. पण पृथ्वीच्या अंतर्भागांतील उष्णतेस पृष्ठावरील खडक दुभंगून अथवा डोंगराचा माथा फोडून बाहेर जावें लागतें. यामुळें धरणीकंप व ज्वालामुखींचे स्फोट होवून संपत्ति, संस्कृति व जीवित यांचा अगणित संहार होतो. मानव-इतिहासाच्या क्रमांतही असेंच घडतें. कांहींशी स्थिरता पावलेला समाज व त्यांतील सत्ताधारी वर्ग काल व परिस्थिति बदलल्यामुळें आपणांत स्वेच्छेनें पालट घडवून आणला पाहिजे ही गोष्ट कबूल करीत नाहींत. चालू परिस्थितींत पालट घडवून आणणें इष्ट आहे असें तुम्ही म्हणा, कीं धर्मगुरु तुम्हांवर पोथ्या उगारतील, राज्यकर्ते तुम्हांवर बॉम्ब टाकतील आणि भांडवलदार तुम्हांला बेकार करतील. प्रत्येक काळीं प्रगतीस त्या त्या काळच्या सत्ताधाऱ्यांचा विरोध झाला आहे. गुलामगिरी नाहींशी करण्यासाठीं रक्तपात करावा लागला. लोकशाहीचे हक्क व्यक्तिमात्रास मिळवून देण्यासाठीं फ्रान्समध्यें कित्येक दिवस माणसांचा कत्तलखाना चालू ठेवावा लागला. राजांची अनियंत्रित सत्ता नियंत्रित करण्यासाठीं इंग्लंडांत भावांनीं भावांवर सुऱ्या चालवल्या. रशियांतला झार, जर्मनींतला कैसर, तुर्कस्थानांतला सुलतान, चीनचा बादशहा यांपैकीं कोणीही 'जगांतला आपला कार्यभाग संपला, चला, आतां मरून जाऊं' असें म्हणून सुखासुखीं निजधामास गेले नाहींत. बदलत्या काळांत आपण अडगळ व उपद्रव आहोंत हें लक्षांतही न घेतां त्यांनीं सर्व चांगल्या गोष्टीही आपल्या रक्षणासाठीं इरेस घातल्या. त्यांचा संहार उघड्या डोळ्यांनीं पाहिला व शेवटीं स्वतः काळाच्या दुर्लंघ्य प्रवाहांत नाइलाजानें वाहून गेले. "सरकार, सत्ताधारी वर्ग व सत्ताधारी गट यांनीं काल-

माहात्म्य लक्षांत घेऊन स्वेच्छेनें अधिकारत्याग केल्याचें उदाहरणच इतिहासांत नाहीं. प्रत्येक वेळीं पाशवी शक्तीच्या प्रत्यक्ष उपयोगानें अथवा धमकीनें त्यांना नमवावें लागलें आहे. अर्थात्, सत्ताधारी व व धनिकवर्ग यापुढें हृदयपरिवर्तन होऊन सत्ता मोडतील, इतिहासांत सत्ताधाऱ्यांचें जें वर्तन दिसून येतें त्याहून अन्य प्रकारें वागतील असें मानणें कधीं तरी सयुक्तिक ठरेल काय ? अशी अपेक्षा करणें हें फोल व मूर्खपणाचें ठरेल.''

## क्रांतीची अपरिहार्यता

धूर्त व दूरदर्शी भांडवलदार आणि सत्ताधारी वर्ग पुष्कळदा श्रमजीवी वर्गाबद्दल आस्था व औदार्य दाखवितात असा अनुभव सर्वत्र येतो. कारखान्यांतील मजुरांना नफा वाटणें, नफ्यांत भागीदारी देणें वगैरे दिलदारीचे प्रकार कांहीं अमेरिकन कारखानदारांनीं अमलांत आणले व इतर देशांतून त्यांचें अनुकरण होत आहे. मजुरांची राहणी सुधारण्याचे प्रयत्न होत आहेत. भावी क्रांति टाळणें हा या उपायांचा मुख्य हेतु असून त्यामुळें श्रमजीवी वर्गास प्रचलित समाजव्यवस्थेबद्दल लालूच उत्पन्न होते. पण यानें क्रांति कायमची थोपवितां येईल अथवा अखिल मानवजातीचे प्रश्न अशा 'औदार्य'-दर्शनानें सुटतील ही आशा अगदीं व्यर्थ आहे. एक तर इंग्लंड व अमेरिका यांसारख्या देशांना आपल्या मजुरांची परिस्थिति सुधारतां येतें याचें कारण हिंदुस्थान, चीन यांसारख्या देशांची पिळणूक ते देश अधिक निपटून करीत असतात हें होय. यामुळें अखिल मानवजातीच्या दृष्टीनें पाहतां दारिद्र्य व दुःख नाहींसें करण्याचा हा उपाय कांहीं लोकांना लांच देण्याइतपतच आहे. दुसरी गोष्ट अशी कीं ही लांचही फार काळ टिकूं शकत नाहीं. ज्या मजुरांची मजुरी वाढते, ज्यांना नफ्यांत भागीदारी मिळते, ज्यांची राहणी सुधारते त्यांना उच्च

राहणीची संवयच लागते. अधिक सुख व अधिक स्वातंत्र्य यांबद्दल त्यांची आकांक्षा वाढत जाते. पण हिंदुस्थान, चीन यांसारख्या देशांत पिळणुकीला प्रतिकार सुरू झाला कीं इंग्लंड-अमेरिकेसारख्या देशांतल्या भांडवलदारांना तंगी बसूं लागून ते मजुरांचे तनखे तोडूं लागतात व ताबडतोब मजुरांतील क्रांतिवृत्ति बळावत जाते. किरकोळ राजकीय सुधारणांनीं ही क्रांतिवृत्ति मारून टाकण्याचाही प्रयत्न केला जातो. अगदींच अनियंत्रित राज्यसत्ता असते तेथें कायदेमंडळें, जबाबदार सत्ता वगैरे देऊन धनिक वर्गास राज्यसत्तेस अनुकूल करून घेण्यांत येतें. पण यामुळें, अराज्यवाद्यांच्या मतें, राज्यप्रकार बदलला तरी बहुसंख्य समाजाची कुचंबणा, पिळणूक व त्यावर होणारा जुलूम थांबत नाहीं व क्रांतीची लाट पुनः पुन्हा उसळून केव्हां तरी एकदां राज्यसंस्थेची आहुति लोकक्षोभांत पडल्यावांचून राहणार नाहीं असा इतिहासाच्या अपरिहार्य क्रमाबद्दल अराज्यवाद्यांचा विश्वास आहे.

## लोकभ्रम हीच अडचण

अशी ही क्रांति कोणत्याही क्षणीं होऊन राज्यहीन समाज केव्हांही निर्माण होऊं शकेल असें अराज्यवाद्यांना वाटतें. तर मग ती क्रांति आजच कां होत नाहीं? आजवर कां झाली नाहीं? याला कारण, लोकांना प्रचलित राज्यसंस्था व समाज-व्यवस्था हींच आजच्या परिस्थितींतले सर्व अनर्थ उत्पन्न करतात, याबद्दल लोकांची खात्री पटली नसून लोकांना या संस्था उपयोगी वाटतात व म्हणून तेच त्या संस्थांना आश्रय देऊन त्यांना टिकवून धरतात. म्हणून त्या आजवर टिकून राहिल्या असें अराज्यवाद्यांचें म्हणणें आहे. ‘ श्रद्धा आणि कल्पना याच समाज-व्यवस्थेचा आधार असतात. त्यांच्या

पायावरच संस्थांची उभारणी होत असते.' राज्यसंस्था कशामुळें टिकून राहते? सैन्य, आरमार, पोलीस वगैरे संरक्षक साधनांमुळें, असें आपण समजतों. पण यांत फार थोडें सत्य आहे. बहुसंख्य समाजास राज्यसंस्था नको झाली कीं बहुसंख्य समाजाच्या मनाविरुद्ध कोणत्याही संरक्षण साधनांनीं राज्यसंस्था टिकूं शकणार नाहीं. 'अमेरिकेंत ५० वर्षेपर्यंत अराज्यवादी, समाजवादी वगैरेंचा मतप्रसार अहोरात्र चालू आहे. अमेरिकेंतील भांडवलदार अत्यंत अनियंत्रित व जुलुमी आहेत. सार्वजनिक अनीति अमेरिकेंत कळसास पोंचली आहे. तथापि तेथें एकंदरीनें असलेल्या सुबत्तेचा मोह जनतेला सोडवत नाहीं आणि तेथील भांडवलशाहींतले दोष आपण हळूहळू दूर करूं असा जनतेला विश्वास वाटत असल्यानें या भांडवलशाहीस अजिबात नष्ट करून टाकण्याचें धैर्य अमेरिकन लोकांत येत नाहीं.' भांडवलशाहीवांचून अथवा अशाच दुसऱ्या कसल्या तरी समाजव्यवस्थेवांचून, मालकीहक्कावांचून आपलें चालूं शकणार नाहीं असें माणसांना वाटतें व म्हणून ही समाजव्यवस्था टिकून राहिली आहे. समाजव्यवस्थेबद्दल, राज्यव्यवस्थेबद्दल असलेला हा लोकभ्रमच अराज्यवादास विघ्न आणतो. माणसांच्या मनाचा विकास होत गेला आणि जुन्या कल्पनांवरील त्यांचा विश्वास नष्ट होऊन नव्या कल्पना त्यास पसंत पडूं लागल्या म्हणजे जुन्या कल्पना नष्ट होऊन नव्या कल्पना व नव्या संस्था रूढ होतात. याच क्रमानें कित्येक शतकें रूढ असलेली 'राजा हा ईश्वरी अंश आहे' ही कल्पना नष्ट झाली. गुलामगिरी ही कित्येक शतकें नांदली, पण अखेर समूळ नाश पावली. शेतकऱ्यांची भूदास पद्धति म्हणजे एक प्रकारची गुलामगिरी हीही अनेक शतकांनंतर बरीच नष्ट झाली. पण अजून जागोजाग जिवंत आहे.

लोकांचा हा श्रद्धापालट आपोआप झाला असें मात्र नव्हे. लोकांच्या दुर्ग्रहाशीं मूठभर विचारवंतांना पिढ्यानुपिढ्या झगडा चालवावा लागला. 'अमुक एक संस्था निरुपयोगी झाली म्हणजे ती आपोआप नष्ट होते' असें कोणी म्हणतात. पण अराज्यवाद्यांचे मतें, राज्यसंस्था, गुलामगिरी, राजा म्हणजे ईश्वर या तत्त्वावर श्रद्धा, धर्मगुरूंचें प्राबल्य, भांडवलशाही, साम्राज्यशाही, या कल्पनांपासून व संस्थांपासून समाजांतील विशिष्ट वर्गांना फायदा झाला असला तरी एकंदर समाजाच्या प्रगतीस या संस्थांची व कल्पनांची कधींही गरज नव्हती. उलट एकंदर समाजावर जुलूम करणें व त्याच्या प्रगतीस अडथळा करणें एवढेंच कार्य यांनीं शतकानुशतकें केलें आहे. 'गरज संपल्यावर या संस्था व कल्पना नष्ट झाल्या' असें म्हणणें चूक आहे. त्यांची गरज केव्हांही नव्हतीच, नेहमीं त्या अपायकारकच होत्या. पण जनतेचा भ्रम नाहींसा झाला तेव्हां त्या नष्ट झाल्या. हा जनतेचा भ्रम, ही अंधश्रद्धा कांहीं थोड्या विचारवंतांनीं पिढ्यानुपिढ्या झगडून नाहींशी केली.

## विध्वंस कां होतो

खरोखर माणसाच्या कल्पना बदलण्यानेंच आजवर राज्यक्रांत्या व समाजक्रांत्या झाल्या असें मानलें तर जीविताचा आणि वित्ताचा क्रांतिकाळांत जो विध्वंस नेहमींच भयानक प्रमाणांत होत आला आहे तसा तो कां व्हावा? एक वस्तु नकोशी झाली अथवा एका परिस्थितीचा कंटाळा आला असतां आपण ती वस्तु सोडतों व हवी ती दुसरी घेतों, एका बिऱ्हाडाचा कंटाळा आला तर मुकाट्यानें जागा बदलतों. पण तसें करतांना नासधूस, उधळमाधळ, मोडतोड, मारहाण, संताप द्वेष असें कांहीं आपण करीत नाहीं. मग क्रांतीच्या वेळीं मात्र या

सर्व गोष्टी हटकून होत आल्या आहेत याचें कारण काय ? अराज्य-वाद्यांच्या मतें याचीं कारणें दोन. पहिलें कारण असें कीं, क्रांति हवी असें वाटणारीं माणसें पहिल्यानें संख्येनें अगदीं थोडीं आसतात. तीं जोरदार व जलद विचार करतात आणि एकंदर जनतेच्या ढिलेपणा-बद्दल, सुस्तपणाबद्दल व अंधश्रद्धेबद्दल, अगदीं अधीर होतात. या अल्पसंख्य विचारी लोकांचा बहुसंख्यांशीं झगडा सुरू होतो व बहु-संख्यांकडून त्यांचा छळ होतो. आणि असें होतां होतां बरेच लोक क्रांतिकारकांना अनुकूल होऊं लागले कीं ज्या सत्ताधाऱ्याचें आसन क्रांती-मुळें उध्वस्त होणार असतें, क्रांतीमुळें ज्यांची राजकीय, धार्मिक, आर्थिक, सामाजिक सत्ता नष्ट होणारी असते तेही सत्ता टिकवि-ण्याच्या मोहानें सर्व प्रकारचा विध्वंस करतात. हें क्रांतीच्या वेळीं होणाऱ्या विध्वंसाचें दुसरें कारण होय. अतिशय छळ पावलेली जनताही सत्ताधाऱ्यांचा विरोध सुरू झाला कीं चिडून जाऊन सूड-भावनेनें अत्याचाराला प्रवृत्त होते. १७८९ मध्यें झालेल्या प्रसिद्ध राज्यक्रांतींत प्रथम अत्याचार फारच थोडे झाले. पण सत्ताधारी वर्गांनीं विदेशी सैन्यें आणून क्रांति दडपून टाकण्याचें कारस्थान रचलें आहे अशी खबर लोकांना लागली तेव्हां मात्र लोकक्षोभ अनावर होऊन शेकडों वर्षें भोगलेल्या छळाचा सूड जनतेनें अगदीं पाशवी निर्दयतेनें सत्ताधाऱ्यांवर उगाविला. अशा वेड्या अत्याचारांनीं खरी क्रांति घडून येत नाहीं. लोक विध्वंस करीत असतात. पण या विध्वंसानंतर निर्माण काय करावयाचें याची दखल लोकांना नसते व एक जुलमी सत्ता गेली तरी दुसरी जुलमी सत्ताच लोकांचे डोकीवर येऊन बसते. फ्रेंच राज्यक्रांतीनें बुर्बोन राजघराणें धुळीस मिळालें तरी नेपोलियनचें जुलूमी राज्य फ्रेंच जनतेवर आलेंच. म्हणून खरीखुरी समाजक्रांति करण्यासाठीं नवी समाजव्यवस्था कशी असेल

याचें जनतेला स्पष्ट ज्ञान झालेलें असलें पाहिजे. समाजघटना बद-लण्याआधीं एकंदर जनतेच्या कल्पना, श्रद्धा यांत पूर्ण पालट होऊन नव्या समाजव्यवस्थेबद्दल त्यांस सविकल्पक ज्ञान झालेलें असलें पाहिजे, " म्हणून समाजक्रांति ही कांहीं आकस्मिकपणें घडणारी घटना नव्हे. कारण जनतेच्या कल्पना अकस्मात बदलूं शकत नाहींत. एखादें फूल जसें हळूहळू उमलत असतें त्याप्रमाणें जन-तेच्या श्रद्धा हळूहळू व क्रमाक्रमानें बदलत जात असतात. या प्रकारें सामाजिक क्रांति हा एक परिपाक आहे; खूपच खूप लोकांनीं नव्या कल्पना स्वीकारल्या व व्यवहारांत त्या आणण्याचा निश्चय केला— इतक्या अवस्थेप्रत लोकजागृति पोंचली कीं तो समाज पालटण्यास परिपक्व होतो व त्या वेळींच क्रांति होते. येथवर लोकांच्या कल्पनेंत जो हळूहळू शांतपणें पालट होत असतो त्यास विरोध झाला कीं ही क्रांति जोरदार होऊं लागते व अत्याचाराचें रूप धारण करते. याचाच अर्थ, विकास हाच क्रांतीचें रूप धारण करतो. यासाठीं विकास आणि क्रांति या भिन्न गोष्टी आहेत अथवा परस्पर-विरोधी आहेत असें मानणें बरोबर नाहीं. पाणी संथपणें तापतां तापतां उष्णतेच्या एका विशिष्ट अंशावर एकदम त्यास उकळी फुटलेली दिसते त्याप्रमाणेंच विकास होतांच एका विशिष्ट अंशावर तो क्रांतीचें रूप धारण करतो. अर्थात् पाणी उकळत्या बिंदूपर्यंत लवकर आणण्यास पाण्याचा विशिष्ट गुणधर्म लक्षांत घेऊन उष्णता वाढविणें हाच उपाय आहे. एरवीं तुमच्या कर्तृत्वाचा तेथें कांहींही उपयोग नाहीं. त्याचप्रमाणें क्रांति ही मनुष्य केवळ आपल्या कर्तृत्वानें करूं म्हटल्यानें होणार नाहीं."

## क्रांतीचें विधायक स्वरूप

यावरून मनुष्य-कर्तृत्वास क्रांतिकार्यांत जागाच नाहीं असें नव्हे,

किंवा पाणी तापविण्याचा दृष्टान्तच घेतल्यास उष्णता अधिक वाढविण्याचें कर्तृत्व जसें माणसास गाजवितां येईल त्याचप्रमाणें क्रांतीचा वेग वाढविणेंही त्यास शक्य आहे. लोकांवर होत असलेला व लोकांकडून होत असणारा प्रतिकार हाच क्रांति घडविणारा अग्नि होय. प्रतिकार अधिकाधिक वाढवून लोकांत जागृति करणें म्हणजेच अग्नि चेतवणें. हें कार्य क्रांतिकारकास करावयाचें असतें. पण यांतही कृत्रिमतेच्या चुका क्रांतिकारकांच्या हातून होण्याची भीति असते. स्टोव्ह चांगला पेटेना व उकळी लवकर येईना म्हणून उकळी डोळ्यांनीं पाहण्यासाठीं अधीर होऊन पातेलें जोरानें हालविलें तर खरीखरी उकळी फुटण्याऐवजीं पातेल्यांतलें पाणी स्टोव्हवर सांडून स्टोव्ह विझण्याची भीति असते. असेंच क्रांतीचें असतें. जनतेच्या मनाची पूर्ण तयारी लवकर होईना व जनता लवकर क्रांति करीना म्हणून अधीर होऊन क्रांतीचे पुढारी घाईनें अत्याचार करतील तर सत्ताधाऱ्यांच्या दडपशाहीखालीं ते व जनता भरडली जाऊन क्रांतीची लाट मागें हटेल. लोक भीतिग्रस्त होतील, गोंधळून जातील व जवळ आलेली क्रांति पुन्हा अनिश्चित भविष्यकालापर्यंत दूर लोटली जाईल. क्रांतिकारकांच्या कर्तृत्वाला जी मर्यादा असते तीही त्यांनीं ओळखली नाहीं तर अनर्थ होतो. फुलाची कळी आपोआप अंतर्गत जोमानें उमलली तरच तें फूल प्रफुल्लित व सुगंधित होतें. झाडांस उत्तम पोषक अन्न पुरविणें, त्याच्या वाढीस भरपूर वाव देणें आणि इतर सर्व प्रकारें स्वच्छ व आरोग्यकारक परिस्थिति राखणें, एवढेंच माळ्याचें काम. यापुढें जाऊन, तो कळी लवकरच उमललेली पाहण्याच्या हावरेपणानें तिच्या पाकळ्या उकलूं लागेल, तर फूल उमललें न जातां तें फक्त कुस्करलें जाऊन कोमेजेल मात्र, तसेंच क्रांतीचेंही आहे. लोकांना सद्यःस्थितींतील जुलमाविरुद्ध जागृत करून त्याविरुद्ध लढण्यास

शिकविलें पाहिजे. सद्य:स्थिति पालटणें अवश्य व शक्य आहे याविषयीं त्यांची खात्री पटविली पाहिजे; स्वातंत्र्य, समता व बंधुभाव यांच्या आधारावर पूर्ण राज्यहीन असा समाज़ निर्माण होऊं शकतो, टिकूं शकतो, विकास पावूं शकतो आणि अशा परिस्थितींतच समाजाचा खरा विकास होतो याबद्दल लोक नि:संदेह झाले पाहिजेत. तरच क्रांति पूर्णपणें यशस्वी होऊं शकेल. क्रांतीसाठीं जनतेची तयारी करावयाची असें म्हटलें कीं गुप्त कट, हत्यारांची जमवाजमव, सरकारी सैन्यांत फितुरी व अखेरीस सशस्त्र बंड अशींच सर्वसामान्य क्रांतिकारकांची क्रांतीच्या तयारीची कल्पना असते. पण अराज्यवाद्यांची कल्पना याहून मूलत:च भिन्न आहे. अराज्यवाद्यांना इष्ट वाटणाऱ्या क्रांतींत थोडीफार शस्त्रयुद्धें होतीलही. पण तो क्रांतीचा फार लहान भाग असेल. एकंदर समाजाची पुनर्घटना करणें हें क्रांतीचें मुख्य कार्य असेल. हें कांहीं लढायांनीं आणि हाणामाऱ्यांनीं होणार नाहीं. लढ्याचा प्रसंग येईल तो पुनर्घटनेचीं साधनें आज ज्यांच्या हातीं आहेत त्यांचेपासून तीं काढून घेतांनाच फक्त येईल. गिरण्या, कारखाने, खाणी, आगगाड्या, भव्य इमारती हीं जीं आजच्या समाजघटनेचीं मुख्य अंगें तींच आपल्याही पुनर्घटनेचीं साधनें होत. आज तीं खाजगी मालकांच्या हातीं आहेत. त्यामुळें समाजघटना नीटपणें न होतां विध्वंस, उपासमार, रोगराई यांचेंच पीक वाढतें आहे. तें बंद करून खरी विधायक स्वरूपाची पुनर्घटना आपणांस घडवून आणावयाची आहे, असें लोकांना स्पष्टपणें कळविलें पाहिजे. क्रांति म्हणजे विध्वंस ही जनतेची कल्पना नष्ट करून अराज्यवादी क्रांति म्हणजे विधायक स्वरूपाची पुनर्घटना असते अशी लोकांची बालंबाल खात्री न झाल्यास आजवर घडले तसे सर्व अनर्थ यापुढेंही घडतील, ते टळणार नाहींत. “ खरोखर उध्वस्त करायचें तें काय ?

धनिकांची संपत्ति ? ती तर सर्व लोकांना उपभोगायला मिळावी अशी आपली इच्छा असते. जमीन, शेतें, खाणी, रेल्वे, कारखाने, गिरण्या, दुकानें यांचा विध्वंस करावयाचा काय ? पण आपणाला हीं उध्वस्त करावयाचीं नसून त्यांचा सर्व समाजासाठीं उपयोग करावयाचा आहे. टेलिग्राफ, टेलिफोन, वाहतुकीचीं व दळणवळणाचीं जीं साधनें आहेत, त्यांचा नाश करावयाचा आहे काय ? नाहीं. सर्व जनतेच्या उपयोगासाठीं आपणांस त्यांची गरज आहे. मग समाजक्रांतीनें उध्वस्त करायचें तें काय ? कांहीं नाहीं. या सर्व वस्तु व सोयी समाजाच्या उपयोगासाठीं आपणांस खाजगी मालकांकडून सार्वजनिक मालकींत घेतां आल्या म्हणजे झालें. विध्वंस नव्हे तर पुनर्घटना, नवी बांधणी हें या क्रांतीचें ध्येय आहे. ही क्रांति माणसांनींच आपल्या बुद्धीनें व हातानें करावयाची असते. म्हणून या माणसांना क्रांतीचे हे विधायक हेतु कळले पाहिजेत. आपले हेतु कोणते तें कळलें म्हणजे मार्ग व साधनेंही कळतात. कारण जसें ध्येय तसेच मार्गही असावे लागतात. विधायक पुनर्घटना म्हटली म्हणजे तिचीं साधनेंही विधायकच असणार. उलट विध्वंसापासून विधायक कर्म निर्माण होणार नाहीं. जें बीज पेराल तसेंच फळ येईल.''

---

## क्रांतीची पूर्वतयारी :　　: : ६

### लोकांची विचारसरणी बदला

क्रांतीची पूर्वतयारी जी करावयाची ती याच दृष्टीनें केली पाहिजे. साध्य जसें विशुद्ध असावें तशींच साधनेंही विशुद्ध व

साध्याच्या जातीचीं असलीं पाहिजेत हा मुद्दा महत्त्वाचा आहे. उदाहरणार्थ, पूर्ण राज्यहीन अशा समाजव्यवस्थेंत पूर्ण व्यक्तिस्वातंत्र्याचा लाभ व्यक्तिमात्रास देणें अवश्य आहे. अर्थात् व्यक्तिस्वातंत्र्य कांहीं एका रात्रींत अकस्मात निर्माण होऊं शकणार नाहीं. समाजांतील व्यक्तिमात्रांत व्यक्तिस्वातंत्र्याची आवड उत्पन्न झाली पाहिजे, तें वापरण्याची सवय लागली पाहिजे व दुसऱ्यास व्यक्तिस्वातंत्र्य वापरूं देण्याइतकी सहिष्णुता व इतरांबद्दल आदरभाव व्यक्तिमात्राचे ठायीं उत्पन्न झाला पाहिजे. थोडक्यांत म्हणजे कोणीही कोणावर सत्ता गाजविण्याची हौस न बाळगतां व तशी जरूरही न राहतां परस्पर स्वेच्छ सहकार्यानें राहण्याची आवड व सवय व्यक्तिमात्राचे ठिकाणीं उत्पन्न केली पाहिजे. केवळ धनोत्पादनसाधनें सार्वजनिक मालकीचीं केलीं म्हणजे सर्व गोष्टी आपोआप नीट होत जातील हा समज चुकीचा आहे. कारण दुसऱ्यावर सत्ता गाजविणें व दुसऱ्याच्या सत्तेखालीं वाकणें ही उभयपक्षीं गुलामगिरीची खोड माणसांत आहे तोंवर, भौतिक परिस्थितींत कोणतेही पालट केले तरी, ती खरीखुरी क्रांति होणार नाहीं. किती दिरंगाईचें आणि चेंगटपणाचें हें काम! अराज्यवादी म्हणतो, 'आहे खरा हा चेंगटपणा; मनुष्यस्वभाव बदलायचा!! आहे खरें बिकट आणि चेंगट हें काम! पण त्याला काय इलाज! तुम्हांला, समजा, एक नवें घर बांधायचें आहे. भराभर मजल्यावर मजले तुम्हीं चढविले आणि घाईमध्यें बांधणी मात्र निष्काळजीपणानें केली तर घर बांधतांबांधतांच तें तुमच्या डोक्यावर कोसळणार नाहीं का? त्यापेक्षां तें मजबूत व्हावें यासाठीं वेळ लागला तरी अगदीं शास्त्रशुद्ध पद्धतीनें बांधण्यासाठीं अवश्य तो वेळ घालविणें बरें नव्हे का? आजवरच्या कोणत्याही क्रांतीच्या तयारीसाठीं व्यक्तिस्वातंत्र्याबद्दल प्रेम व सहिष्णुता निर्माण करण्यांत

आली नव्हती. राज्यसत्ता हीच समाजावर खरें संकट आहे हें मानवजातीस पटविण्यांत आलें नव्हतें. माणसांची समजूत बदलण्याचा हा मूलग्राही प्रयत्न आजवर कोणींच केला नाहीं यामुळें क्रांति झाली तरी एक जुलूम जाऊन दुसरा त्याचे जागीं आलाच. पण राज्यसत्ता नको हें समाजास पटविलें म्हणजे हजारों वर्षें होत आलेली ही जुलुमाची पुनरावृत्ति टळेल. जुलूम मनुष्यस्वभावांतूनच नाहींसा केल्यावांचून समाजांतून त्याचें उच्चाटन कधींच होणार नाहीं. माणसांच्या विचारसरणींत ही क्रांति करण्यासाठीं सर्वच समाजाची या तत्त्वावर संघटना करणें अवश्य आहे.

## शेतकरी व कामकरी यांची संघटना

या संघटनेंत कामकरी-संघटनेचें कार्य फार मोठें आहे हें निःसंशय. आगगाड्या, खाणी, कारखाने, गिरण्या, गोद्या हीं सर्व प्रचंड उत्पादनाचीं व प्रचंड वाहतुकीचीं साधनें समाजाचा प्राणच आहेत. त्यांतील कामगारांत स्वातंत्र्यवादी भावना निर्माण झाल्यास अराज्यवादी समाजाचा पाया भक्कम घातला जाईल. कामगार जर अराज्यवादास प्रतिकूल असतील, त्यांच्या ठिकाणीं व्यक्तिस्वातंत्र्य-प्रेम असणार नाहीं, तर अराज्यवादी समाजघटना यशस्वी होणार नाहीं; इतकेंच नव्हे तर अस्तित्वांतही येणार नाहीं. पण एकट्या कामगारसंघटनेनेंच सर्व प्रश्न सुटतील असें मात्र कोणी समजूं नये. कामगारांच्या हातीं वाहतुकीचीं व उत्पादनाचीं प्रचंड साधनें असलीं तरी एकंदर मनुष्यसमाजांत त्यांची संख्या फार थोडी आहे आणि अराज्यवादी क्रांति तर बहुसंख्य समाजाची क्रांति आहे. केवळ निम्याहून अधिक लोकांना अराज्यवाद पटूनही कार्यभाग होणार नाहीं. अराज्यवाद इष्ट, व्यवहार्य, अपरिहार्य व निकडीचा आहे असें फारच फार मोठ्या संख्येस पटलें पाहिजे व

त्यासाठीं वाटेल तो स्वार्थत्याग करण्यास या बहुसंख्य समाजाची तयारी झाली पाहिजे. म्हणून लोकसंख्येंत प्रचंड स्थान असलेला जो शेतकरी-समाज त्याची अराज्यवादी तत्त्वावर संघटना करणें अत्यवश्य आहे. आगगाड्या, कारखाने हीं उत्पादनाचीं व वाहतुकीचीं साधनें समाज-व्यवस्थेंत फार महत्त्वाचीं आहेत. पण शेतीही अतिशय महत्त्वाची आहे. शेतकऱ्यांना राज्यहीन समाजाचें महत्त्व पटलें नाहीं तर अन्न-द्रव्यें आणि कच्चा माल अडवून ठेवून शेतकरी शहरांना उपाशी मारतील. म्हणून शेतकऱ्यांची संघटना अवश्य आहे. कामगारवर्ग हा अधिक जागृत असतो व त्याची संघटना लवकर होऊं शकते. या दृष्टीनें कामगारसंघटना आधीं होईल व शेतकरी संघटनेचें नेतृत्व कामगारसंघटनेकडे येईल हें स्वाभाविकच आहे. क्रांतीची सुरुवात होईल तीही आगगाड्या, कारखाने वगैरे कामगारांच्या जगांत प्रथम होईल; पण तिला जर ताबडतोब शेतकरी-संघटनेकडून पाठिंबा मिळणार नाहीं व शेतकरी हे विरोधी अथवा बेफिकीर राहतील तर अल्पसंख्य अशा कामगारांची क्रांति सत्ताधारी वर्गाकडून तातडीनें व अत्यंत क्रूरपणें दडपली जाईल; म्हणून कामगार हे क्रांतीचें आघाडीचें सैन्य मानलें गेलें तरी शेतकरीवर्ग हें बाकीचें सर्व सैन्य व युद्धसाहित्य मानावें लागेल. बाकीचें सैन्य व युद्धसाहित्य यावांचून केवळ आघाडीच्या सैन्यानें लढा जिंकला जाऊं शकणार नाहीं.

### मध्यम वर्गाचें महत्त्व

कामकरी व शेतकरी यांची संघटना व सहकार्य याची ज्याप्रमाणें क्रांतिकार्यास अतिशय जरूरी आहे, त्याप्रमाणें यंत्रज्ञ, शास्त्रज्ञ, बौद्धिक विद्येंतले पंडित यांचीही संघटना व क्रांतीच्या कामीं सहकार्य अवश्य आहे. जग कांहीं केवळ शारीरिक कष्टांनींच उभारण्यांत आलेलें नाहीं. त्याला मेंदूचें साहाय्य फार मोठ्या प्रमाणांत झालेलें आहे. रोजची

कारखान्यांची उभारणी केवळ हातकष्ट करणाऱ्या कामगारांनींच केली नाहीं व झाली नसती. एंजिनिअर, कंडक्टर या सर्वांचें बौद्धिक साहाय्य त्या कामीं घ्यावें लागलें आहे. समाज राज्यहीन होईल तेव्हांही हें साहाय्य अवश्यच असणार आहे. म्हणून एंजिनियर, कंडक्टर, प्रोफेसर यांचीही संघटना केली पाहिजे. अराज्यवादी समाजाच्या आवश्यकतेबद्दल व शक्यतेबद्दल त्यांचीही खात्री पटविली पाहिजे व अराज्यवादी क्रांतीच्या कामीं सहकार्य व स्वार्थत्याग करण्यासाठीं त्यांचीही तयारी केली पाहिजे. राज्यहीन समाज-व्यवस्थेंत उद्योगधंद्यांची पुनर्घटना करावयाची असते. धनाचें उत्पादन व वांटणी यांचीही सुगम व्यवस्था लावावयाची असते. आणि समाजां-तील शैक्षणिक, सांस्कृतिक वगैरे संघटना व व्यवहार अधिक चांगल्या पद्धतीनें चालवावयाचे असतात. अर्थात् शास्त्रज्ञ, यंत्रज्ञ, शिक्षक, वैद्य वगैरे सर्व समाजघटकांची कामकरी-शेतकरी यांच्या इतकीच निकडीची गरज राज्यहीन समाजास आहे. किंबहुना अमक्याची गरज कमी व अमक्याची अधिक ही विचारसरणी क्रांति-कार्यास घातकच ठरेल. सद्यःस्थितींत सर्व बुद्धिजीवी वर्ग हे शेतकरी-कामकऱ्यांहून स्वतांला श्रेष्ठ समजतात, भांडवलदारवर्गाशीं मिळून-मिसळून वागतात, कोणत्याही क्रांतिकारक संघटनेस ते प्रतिकूल आहेत ही गोष्ट खरी आहे; पण बुद्धिवादी म्हणविणारे हे वर्ग भ्रममूढ झालेले आहेत हें याचें कारण होय. कामकरीवर्गास ज्याप्रमाणें भांडवलदारांनीं उभारलेल्या कारखान्यांखेरीज चरितार्थाचें साधन असें वेगळें कांहींच नाहीं, तो स्वतः कफल्लकच आहे, त्याप्रमाणेंच मास्तर, प्रोफेसर, एंजिनियर, शास्त्रज्ञ हे सर्व वर्ग वास्तविक स्वतां कफल्लकच आहेत. यांच्या चरितार्थाचीं साधनें धनिकांनीं उभारलेले अथवा पोसलेले कारखाने, प्रयोगशाळा, शिक्षणाच्या शाळा व कॉलेजें

हींच होत. आणि भांडवलशाहीच्या अंगभूत दोषांमुळें बेकारीनें या वर्गांनाही ग्रासलें आहेच. पण यांचा समाजक्रांतविर विश्वास बसत नाहीं. आजवरच्या सर्व क्रांत्यांचे वेळीं शेतकरी-कामकऱ्यांनीं अनान्वित अत्याचार केले व बुद्धिजीवी वर्गास द्वेषानें, तिरस्कारानें व संशयानें वागविलें यामुळें शेतकरी-कामकऱ्यांनीं हातीं घेतलेल्या क्रांतिकार्यांत सामील होणें म्हणजे हातचें सोडून धावत्याचे मागें लागण्यासारखें वेडेपणाचें होईल अशी त्यांस भीति वाटते. अराज्यवाद म्हणजे बेबंदशाही नव्हे. ती एक सुव्यवस्थाच आहे. म्हणूनच त्यांत बौद्धिक पात्रता मिळविलेल्यांचा उपयोग असून समाजांत इतरां-प्रमाणेंच त्यांना आदरानें व स्नेहानें वागविलें जाईल अशी खात्री बौद्धिक दृष्ट्या बुद्धिजीवी वर्गाची पटविल्यास समाजक्रांतीचे कामीं या वर्गाचें सहकार्य मिळविणें कठीण पडणार नाहीं. ज्यांची बौद्धिक योग्यता वाढलेली असते त्यांना आपल्या बुद्धीचा उपयोग करण्यांत एक प्रकारचा आनंद होत असतो. उत्तम खेळाडूस खेळ खेळण्याचें कौशल्य दाखविण्यांत ज्या प्रकारचा आल्हाद वाटत असतो तसाच आल्हाद बुद्धिमान् वर्गास आपलें बौद्धिक कर्तृत्व उपयोगांत आणण्यां-तही वाटत असतो. पण सामान्यतः आपल्या भौतिक गरजा भागल्या जातील अशी निश्चितता त्यास हवी असते व म्हणून अनिश्चितपणाचें व धोक्याचें मूर्तिमंत स्वरूप मानली गेलेली क्रांति त्यास नको वाटते. विचारीपणाचाच भीति हा एक अंगभूत गुण त्याचे ठिकाणीं बराच असतो. म्हणून क्रांतीसंबंधानें त्याचे अंगीं निर्भयता उत्पन्न करणें हें अत्यवश्य आहे. या बुद्धिजीवी वर्गातले लोक जसे कांहींसे भित्रे असतात हें खरेंच, त्याप्रमाणें याच वर्गांतून अत्यंत निधड्या छातीचे वीर, समाजसंघटना व समाजक्रांति घडवून आणणारे उपदेशक आणि पुढारी निर्माण होतात ही गोष्टही इतिहाससिद्ध आहे. म्हणून या

वर्गाची उपेक्षा करून चालत नाहीं. सोन्याच्या खाणीच्या अथवा हिऱ्याच्या खाणीच्या प्रदेशांत जिकडे तिकडे सोनें आणि हिरेच असतात असें नव्हे. मातीचीं ढेकळें आणि दगडधोंडेच फार. पण यांतून सोन्याचे कण आणि हिऱ्याचे खडे शोधून काढून शुद्ध करून बाजारांत येणारें पिवळें धमक सोनें व तेजःपुंज हिरे बनविले जातात. त्यासाठीं खाणीच्या प्रदेशांतील सगळीं ढेकळें आणि दगडधोंडे शोधावे लागतात, हाताळावे लागतात. असेंच या बुद्धिजीवी वर्गासंबंधीं आहे. इतिहासांत क्रांतिकारकांचे अग्रणी म्हणून अमर झालेलीं गॅरिबाल्डी, कोसूथ, लेबकेनेट, लेनिन, ट्रॉट्स्की, टिळक, आगरकर, गांधी हीं सर्व माणसें या बुद्धिजीवी वर्गांतूनच पुढें आलीं आहेत. म्हणून क्रांतीचे कामीं या बुद्धिजीवी वर्गाच्या मताची उपेक्षा करून चालणार नाहीं. या बुद्धिजीवी वर्गांतूनच पुढें आलेले पुष्कळ क्रांतिकारक दुर्दैवानें या बुद्धिजीवी वर्गास प्रतिगामी म्हणून तिरस्कारीत असतात. पण अराज्यवादी क्रांति ज्यांना घडवून आणावयाची असेल त्यांनीं ही वृत्ति सोडून दिली पाहिजे.

## निरनिराळ्या राष्ट्रांतील क्रांति

निरनिराळ्या देशांत अराज्यवादी क्रांति कशी घडून येईल हा प्रश्न अर्थातच त्या त्या देशांतील लोकांचा स्वभाव, सवयी, परंपरा, वगैरेवरूनच ठरूं शकेल. पण सामान्यतः सर्व प्रचलित राज्यसत्तांचें आणि समाजव्यवस्थांचें स्वरूप जनतेची पिळणूक, राजकीय गुलामगिरी, आर्थिक हक्कदारी वगैरे बाबतींत सामान्यतः सारखेंच असतें. आणि यांचाच नाश सर्वत्र करावयाचा असल्यानें क्रांतीचें स्वरूपही कांहीं मर्यादेपर्यंत सर्वत्र सारखें राहूं शकतें. “संपत्तीचें उत्पादन, वाटणी आणि दळणवळण यांचीं साधनें हाच मानवी जीवनाचा

प्रमुख आधार होय. जुलूम करणारी राज्यसत्ता व पिळणूक करणारे भांडवलदार यांचें सर्व सामर्थ्य या साधनांवर त्यांच्या असणाऱ्या मालकींतच साठलेलें आहे. ही त्यांची मालकी रद्द केली म्हणजे गव्हर्नर, व्हाइसरॉय, मंत्री, आणि भांडवलदार हे तुमच्या आमच्या-सारखीं अगदीं सामान्य माणसेंच आहेत. ही परिस्थिति निर्माण करणें हें कोणत्याही देशांतल्या अराज्यवादी क्रांतीचें प्रमुख कर्तव्य होय.'' अराज्यवादी क्रांतींत विध्वंस शक्य तों टाळावयाचा असतो असें वर म्हटलेंच आहे. पण क्रांतीची सुरुवात रस्तोरस्तीं होणाऱ्या दंग्या-धोप्यांनींच होत असते. शेंकडों वर्षें जनतेनें भोगलेलें दुःख व अपमान यामुळें जनतेंत रुजलेली सूडबुद्धि, वरचें दडपण नाहींसें होतांच, उसळून येते त्याचा हा दुष्परिणाम होय. या अत्याचारांचें समर्थन कोणीही खरा अराज्यवादी करूं शकणार नाहीं. पण क्रांतीच्या या अत्याचारांची जबाबदारी राज्यकर्त्यांवर व सत्ताधाऱ्यांवर असतें. 'वारा उठविला तर त्यापासून वादळाचा अनर्थ उद्भवून आपल्या अंगावर कोसळेल' ही साधी गोष्ट आर्थिक व राजकीय सत्ताधाऱ्यांच्या लक्षांत जुलूम करतांना येत नाहीं. पूर्वी जुलूम जेवढा प्रखर झाला असेल तितकी जनतेच्या अत्याचाराची उसळीही प्रखर असते. म्हणून क्रांतिकाळीं अत्याचार होऊं नयेत ही खबरदारी ज्याप्रमाणें क्रांति-कारक पुढाऱ्यांनीं घेतली पाहिजे त्याप्रमाणेंच सत्ताधाऱ्यांनींही घेतलीच पाहिजे. जगांतील कोणतीही राज्यव्यवस्था व समाज-व्यवस्था हीं चिरंजीव नव्हत. आज ना उद्यां त्यांत क्रांति होणारच. ही क्रांति जास्तींत जास्त शांततेनें होण्यांतच प्रचलित सत्ताधाऱ्यांचें-ही कल्याण आहे. हें ओळखून सत्ताधाऱ्यांनीं लोकक्षोभ न वाढेल असें करणें अगत्याचें असतें. पण सत्ताधाऱ्यांना ही गोष्ट पटत नाहीं हा भाग निराळा. असो.

जनतेकडून होत असणारा अत्याचारही विशिष्ट पद्धतीनें होत असतो. हॅम्लेटच्या वेडांतही शिस्त होती तशीच क्रांतिवादी जनतेच्या अत्याचारी वेडांतही शिस्त असते. जुलूम करणाऱ्या राज्यसत्तेचीं प्रतीकें कोणतीं तें जनतेस माहीत असतें. त्यांचाच विध्वंस जनता करते. तुरुंग व पोलीस स्टेशन्स यांचा विध्वंस केला जातो. कायदेशीर दस्तैवज व ते संभाळणाऱ्या इमारती जाळल्या जातात. कैद्यांची मुक्तता केली जाते. फ्रान्सच्या राज्यक्रांतींत जुलुमाचें आगर असा जो बॅस्टिल तुरुंग तो पाडला गेला. पण पहिली उसळी लवकरच ओसरल्यावर लोक शांत होतात व शांततेच्या व्यावहारिक राजकारणाकडे वळतात.

अराज्यवाद्यांनीं लोकजागृति किती चांगली केली असेल त्यावर भावी काळांत अत्याचाराचा काळ अतिसंक्षिप्त होणें अवलंबून आहे. लोकजागृति उत्तम झाली असेल, तर ताबडतोब पुनर्घटनेस सुरुवात होईल. ही पुनर्घटना लोकांनीं बुद्धिपुरस्सर करावयाची आहे. आपोआप कांहींही होणार नाहीं.

## निःशस्त्रप्रतिकार हाच क्रांतिमार्ग

पण सरकारचीं प्रचंड शस्त्रास्त्रें, विषारी धूर, बॉंब टाकणारीं विमानें यांविरुद्ध क्रांतिकारकांचा लढा कधीं तरी यशस्वी होईल काय? असा बिनतोड वाटणारा प्रश्न मनापुढें उभा राहतो. याला 'हो, हो' असें अराज्यवाद्यांचें धिटाईचें उत्तर आहे. उलट क्रांतिकारकांना येणारें यश, अत्याचार व विध्वंस यांनीं येणार नसून मुख्यतः निःशस्त्रप्रतिकारानेंच येऊं शकेल असें अराज्यवाद्यांचें म्हणणें आहे. कामकरी-शेतकऱ्यांनीं आपल्या सशस्त्र लढ्याच्या तुकड्या बनवाव्या हा उपदेश अराज्यवाद्यांना हास्यास्पद वाटतो.

असें करणें म्हणजे आपल्या शक्तीचा अपव्यय करणें आणि विध्वंस व दहशत ओढवून घेणें होय असें त्यांचें म्हणणें आहे.

"शांततायुक्त सार्वत्रिक संप हें अराज्यवाद्यांचें क्रांतीचें हत्यार; ह्याच त्यांचा क्रांतिमार्ग होय. खरोखर अराज्यवादी क्रांति म्हणजे संप, कामकरी व अखिल राष्ट्र यांचा सार्वत्रिक संप. सशस्त्र क्रांति हा आतां मूर्खपणाच ठरणार आहे. सशस्त्र क्रांति म्हणजे हजारों कामगारांना यमसदनास पाठविण्याचा निश्चित उपाय! सशस्त्र क्रांतीची कल्पना जुनीपुराणी झाली आहे, घातकी ठरली आहे. ती कल्पना सोडून देण्याची वेळ आतां येत आहे. आजकाल राज्यकर्ते व भांडवलदार यांनीं लष्करी संघटना इतकी दरोबस्त केली आहे कीं, कामगार व जनता यांना राज्यकर्त्यांशीं लष्करी लढा देणें जवळ जवळ अशक्य आहे. म्हणून सशस्त्र क्रांतीचा प्रयत्न करणें ही आतां गुन्हेगारी अथवा वेडेपणा ठरेल. शस्त्रयुद्धाची रणभूमि हें कामगारांचें व जनतेचें आतां बलस्थान नव्हे. त्यांचीं बलस्थानें म्हणजे कारखाना, गिरणी, खाणी, दुकानें, वर्कशॉप, बँक-ऑफिस हींच होत." यांत सार्वत्रिक संप घडवून आणणें म्हणजेच अराज्यवादी क्रांतीस सुरुवात करणें होय. सार्वत्रिक संपाचें क्रांतिकारक सामर्थ्य राज्य-कर्त्यांना आतां चांगलें पटलें आहे. १९२६ सालीं कोळशाच्या खाणीं-तील कामगारांचीं गाऱ्हाणीं धसास लावण्यासाठीं ब्रिटिश कामगारांनीं सार्वत्रिक संप केला, तेव्हां राज्यक्रांति करणें हा कामगारांचा मुळींच हेतु नव्हता; पण हा संप म्हणजे 'ही क्रांति सुरू झाली' असा पुकारा राज्यकर्त्यांनीं केलाच. सशस्त्र बंडापेक्षांहि या सार्वत्रिक संपाचें बळ अधिक आहे ही गोष्ट त्या वेळीं ब्रिटिश सरकारनें पूर्णपणें ओळखली. इंग्लंडचा सर्व भांडवलशाही सांगाडा क्षणार्धांत मोडून पडणार आणि कोटींचे, अब्जांचे दौलतदार, रोज चार शिलिंग मिळवि-

णाऱ्या कामगारापेक्षांहि हीन दशेस पोंचणार या भीतीनें भांडवलदारांचीं आंतडीं गोळा होऊं लागलीं. पण या परिस्थितीवर प्रचंड सैन्य व प्रचंड आरमार यांनीं इलाज चालणारा नव्हता. लोकांना बंदुकीनें गोळी घालून ठार मारतां येईल; पण त्यांस गोळी घालून कामावर लावतां येणार नाहीं. हा सार्वत्रिक संप चिरडून टाकण्यांत ब्रिटिश सरकारला जें यश आलें तें शस्त्रास्त्रबलानें आलें नाहीं; तर संपाच्या पुढाऱ्यांचे ठिकाणीं निर्धार कमी होता व त्यांना आणि एकंदर मजूरवर्गाला क्रांतीची जबाबदारी अपरिहार्यपणें आपल्या अंगावर येऊन कोसळ-णार याची भीति वाटून त्यांनीं माघार घेतली व म्हणून सरकारला यश आलें. सार्वत्रिक संपाची कल्पनाच कामगारांना इतकी नवी होती कीं, त्यांनीं केलेल्या संपानें उत्पन्न झालेल्या क्रांतिमय वाता-वरणासच कामगार भेदरले व त्यांनीं संपांत माघार घेतली. "सार्वत्रिक संप हेंच क्रांतीचें खरें साधन होय हें आपण आतां समजावून घेतलें पाहिजे. सार्वत्रिक संपाचा हेतु क्रांति हाच असतो, क्रांतीचा तोच व्यवहार्य मार्ग होय. ही गोष्ट आजवर विशेष जोर देऊन सांगण्यांत आलेली नाहीं. आपण आज हें समजून घेतलें तर क्रांति ही आज वाटतें तशी अंधुक, अव्यक्त वाटणार नाहीं. तर क्रांति सत्यसृष्टींत येण्यासारखी आहे हें आपणांस पटेल; आणि सार्वत्रिक संप करून संघटित कामगारांनीं उत्पादनसाधनें हातीं घेणें हाच क्रांतीचा राज-मार्ग आहे याबद्दल लोकांची खात्री होईल."

## संघटना हा निसर्गस्वभाव

राज्यहीन समाजांत राज्यसंस्था व त्याबरोबरच मालकीहक्कांवर आधारलेल्या इतर संस्थाही नष्ट होतात. यावरूनच अराज्यवाद म्हणजे बेबंदशाही असें मानण्यांत येतें; आणि बेबंदशाही म्हणजे त्यांत अत्याचार

आलाच असेंही सांगण्यांत येतें. पण अराज्यवाद म्हणजे अत्याचार नव्हे आणि बेबदशाहीही नव्हे. सत्तीवर आधारलेली कोणतीही आर्थिक राजकीय, सामाजिक संघटना राज्यहीन समाजांत राहणार नाहीं. याचा अर्थ संघटनाच राहणार नाहीं आणि मोकाटपणा म्हणजे बेबंदशाही निर्माण होईल असा नव्हे; संघटनेशिवाय निसर्गांत कांहींही राहूं शकत नाहीं. राष्ट्र, कुटुंब या संघटना आहेत. अशाच जिवंत प्राणिशरीर, जिवंत वनस्पति याही संघटनाच आहेत. मनुष्य-प्राणि जाणीवयुक्त असतो. इतर प्राण्यांना जाणीव कमी असते व वनस्पतींना जाणीव नाहीं असें आपण मानतों. तथापि त्या संघटनाच आहेत. सजीव प्राण्याचा अथवा वनस्पतीचा प्रत्येक अवयव अशा प्रकारें त्याच्या शरीरास जोडलेला असतो कीं, सर्व अवयवांच्या परस्परसहकार्यानें शरीरांतील जिवंतपणाचे व्यापार सुरळीत चालू राहतात. खुर्चीचे पाय परस्परसहकार्यानें खुर्चीस उभे राहण्यास मदत करतात. यावरून खुर्ची ही एक संघटनाच आहे. पण प्राणी अथवा वनस्पति या संघटना खुर्चीपेक्षां अधिक श्रेष्ठ दर्जाच्या आहेत. खुर्ची निर्जीव आहे. तिला वाढ नाहीं; पण प्राणी व वनस्पति जिवंत असून वाढूं शकतात. आपल्या पोषणास व वाढीस सृष्टींतून पोषक द्रव्यें मिळविण्याचें कार्य या संघटना करूं शकतात. यांची ही जिवंत कार्यक्षमता सर्व अवयवांच्या परस्परजुळणीवर व परस्परसहकार्यावर अवलंबून असते. भांडवल-शाही समाजव्यवस्था व जगांतील आजवरच्या सर्व राज्यसंस्था आणि समाजव्यवस्था या एक प्रकारें अशा जिवंत संघटनाच होत. सृष्टींतून आपल्या पोषणास व वाढीस अवश्य असणारीं द्रव्यें मिळवून या समाजव्यवस्था आजवर विकसत गेल्या. पण दुखणाईत शरीराप्रमाणें या सर्व समाजव्यवस्था दुखणाईत होत्या. एखाद्या शरीराचा हात, पाय, कान वगैरे अवयव मोडला असला,

दुखावला असला अथवा त्यांत कांहीं व्यंग असलें म्हणजे तें शरीर जिवंत असलें व वाढत असलें तरी त्या अवयवास व त्यामुळें सगळ्या शरीरासही वेदना होत असतात, तसें आजवरच्या सर्व समाज-व्यवस्थांचें झालें. त्यांच्या कोणत्या तरी अवयवांवर म्हणजे घटकांवर समाजपोषणाचा फाजील भार पडला व त्याचें पोषण होण्याऐवजीं शोषणच अधिक झालें आणि त्यामुळें समाजव्यवस्था आजारी माणसाप्रमाणें नेहमीं कण्हत-कुंथत राहिली. राज्यसंस्था व खाजगी मालकीवर आधारलेल्या सर्व संस्था नाहींशा होऊन स्वेच्छ अशा परस्परसहकार्यावर जेव्हां समाजाची उभारणी होईल त्याच वेळीं अत्यंत निरोगी, बलवान्, कार्यक्षम व सुखी समाज निर्माण होईल असें अराज्यवाद्यांचें म्हणणें आहे.

## संघटना कशी करावी

राज्यहीन समाजव्यवस्था निर्माण करण्यासाठीं, अराज्यवादी क्रांतीपूर्वीच या धोरणानें कामगार-संघटना निर्माण करण्याची सुरुवात केली पाहिजे. जिवंत शरीरांतील निरनिराळ्या अवयवांत श्रेष्ठ-कनिष्ठपणा मानून चालत नाहीं; सर्वांस सारख्याच गरजूपणानें दर्जानें व ममत्वानें वागवावें लागतें आणि सबंध शरीर हें एकजिनसी आहे असें धरून चालावें लागतें. त्याप्रमाणें एकंदर समाजाचीही, विशेषत: कारखानदारी जगांतील सर्व कामगारांची, संघटना करावी लागते. कामगार कितीही ‘हलकें’ अथवा ‘भारी’ काम करणारा असो, कामगारसंघांत त्यास सामील करून घेऊन संघानें त्याची इतर सर्व कामगारांइतकीच काळजी वाहणें अवश्य आहे. पूर्ण व्यक्ति-स्वातंत्र्य व सर्वांस सारखा दर्जा या तत्त्वांवर कामगारसंघाची उभारणी करावयाची असते. मालकवर्ग अथवा जनतेची पिळणूक चालू ठेवणारी राज्यसंस्था याविरुद्ध सर्वच कामगारांचे सारखेच हितसंबंध आहेत असें

मानणें हें कामगारसंघाचें मुख्य धोरण असलें पाहिजे. हल्लींची एकंदर कामगार-संघटना किती सदोष आहे पहा. एका धंद्याच्या एका शाखेचे कामगार हे संपावर असतां त्याच धंद्याच्या दुसऱ्या शाखेचे कामगार हे कामावर असतातच. उदाहरणार्थ, न्यूयॉर्कमधील मोटारींवरील कामगार संपावर गेले असतां वाहतुकीच्या इतर साधनांवरील कामगार कामावर जात राहिले तर ही केवढी हास्यास्पद गोष्ट आहे! कामगारांच्या मागण्या मान्य करण्यास मालकवर्गास भाग पाडणें हा संपाचा हेतु असतो. पण मालकवर्गाचा व्यवहार चोहोंकडून एकसारखा व एकदम आंखडला तरच मालकवर्ग वठणीवर येईल हें कोणासही सहज कळण्यासारखें आहे. अर्थात् अर्धवट संप करणें म्हणजे कामगारसंघाच्या शक्तीची उधळपट्टी करण्यासारखें आहे. शिवाय हे अर्धवट संप अखेर अयशस्वी होतात आणि त्यामुळें कामगारांचें नैतिक बळ कमी होऊन कामगार-संघटनेवरील त्याचा विश्वास नाहींसा होतो हें फार मोठें नुकसान आहे. शरीराचा एक पाय शरीरास पुढें खेचील व दुसरा पाय मागें खेचील तर तें शरीर विकल झाल्याशिवाय राहणार नाहीं हें तत्त्व कामगार-संघटनेंत लक्षांत ठेवलें पाहिजे. हल्लींच्या कामगार-संघटनेंत पुष्कळदा खाणीच्या धंद्यांतील एका शाखेंत अथवा एका प्रदेशांतल्या खाणींत संप चालू असतां दुसऱ्या शाखेंतले अथवा दुसऱ्या खाणींतले कामगार कामावर राहतात व आपल्या मजुरींतला कांहीं भाग संपवाल्यांच्या मदतीसाठीं देत असतात. पण हेंही हास्यास्पदच आहे. जोंवर इतर खाणींतले अथवा इतर शाखांतले कामगार कामावर आहेत तोंवर संपवाल्यांना यश येणार नाहीं. त्यांना इतर कामगारांकडून मदत मिळत राहिल्यास त्यास संप अधिक काळ टिकवून धरतां येईल खरा; पण त्यामुळें तितके अधिक दिवस हालअपेष्टा

काढाव्या लागतील इतकाच याचा अर्थ होय. अशा फुटकळ संपांत यश येणें अशक्यच असतें. पण फंड मिळतो म्हणून वरचेवर फुटकळ संप करण्याची खोड कामगारांना लागते व एकंदरीनें त्यांचा नैतिक अधःपात होत राहतो. कामगारसंपाचे अहवाल तपासून पाहिले तर बहुतेक वेळीं कामगारांना अपयश येऊन संपामुळें कामगारांवर आपत्ति कोसळली असल्याचेंच आढळून येईल. असे फुटकळ संप न करतां विशेष प्रक्षोभक अशा कारणांसाठीं सार्वत्रिक संप घड-विण्यांत आले असते तर ते यशस्वी होऊन क्रांतीचा प्रदेश कित्येक योजनें अधिक जवळ आला असता.

कामगारांना कामगार-संघाबद्दल फारसा उत्साह वाटत नाहीं असा सर्वत्र अनुभव आहे. याला अनेक कारणें असतात. काम-गारांचें हित करणें हेंच कामगार-संघांचें ध्येय आहे हें कोणीच अमान्य करीत नाहीं. पण प्रत्यक्ष व्यवहारांत कामगारांना वेगळेंच दृश्य दृष्टीस पडतें. कामगारपुढारी संपाचे वेळीं लांच खाऊन संप मोडतात व कामगारांचा विश्वासघात करतात हें कामगारांना दिसत असतें. कामगारसंघाच्या क्षेत्रांत व बाहेरही राज्ययंत्राचा जो पगडा बसलेला असतो त्यापुढें कामगार हे हतबल आहेत हें त्यांस अनुभवानें माहीत असतें. हें असें कां, हें त्यांना कळत नाहीं. पण वस्तुस्थिति आहे अशी आहे असें त्यांना दिसतें व कामगार-संघटनेसंबंधानें ते नाउमेद होतात.

## संघटनेंत लोकशाहीची जरूरी

कामगार-संघटनांत लोकशाहीचा पूर्ण अभाव असतो हेंही कामगारसंघासंबंधानें कामगारवर्ग उदासीन असण्याचें प्रमुख कारण आहे. जगांतील सर्व देशांत हल्लीं ज्या कामगार-संघटना आहेत

त्या जितक्या अधिक प्रचंड तितकी त्यांत लोकशाही कमी असा अनुभव आहे. सर्व कामगारांचें धोरण एकसूत्री राहावें यासाठीं कामगार-संघटना व्यापक असाव्या हें निःसंशय; पण हल्लीं याचा असा परिणाम होतो कीं, संघांचीं धोरणें आंखण्याची हक्कदारी वरच्या वरच्या कार्यकारी मंडळांचे हातीं राहून खालचे अधिकारी व सामान्य कामगार यांचें स्थान सांगकामेपणाचेंच राहतें. फक्त वरून सुटणाऱ्या हुकुमांची तामिली त्यांस करावी लागते. कामगारांच्या वैयक्तिक अडचणींचा व विचारसरणीचा हात अथवा आवाज वरपर्यंत पोंचतच नाहीं. आणि सभा भरली असतां चिटणिसांच्या हुकुमासरशीं हात वर करून कामगारांना निरनिराळ्या धोरणांना मंजुरी द्यावी लागते. कामगार-संघांचे अधिकारी हे राज्यसत्तेच्या अधिकाऱ्यांसारखेच बनतात आणि त्यांचा दुहेरी जुलूम कामगारांना सोसावा लागतो. कामगारांत खरेंखुरें चैतन्य निर्माण केलें तर जगाचा सर्व पसारा आपल्या हातीं आहे असा आत्मविश्वास कामगारांच्या ठिकाणीं सहज निर्माण होईल.

संघाच्या सभांत ठरावांना हात वर करणें एवढेंच कामगारांचें सामर्थ्य नव्हे; कामगारांचें खरें सामर्थ्य ते ज्या खाणींत, कारखान्यांत, गिरणींत काम करतात तेथें आहे. हें सामर्थ्य एकजूट व्हावें यासाठीं कामगारांची अशा कारखान्यांत, खाणींत, गिरणींत संघटना झाली पाहिजे. एकेका कारखान्यांत, गिरणींत, खाणींत वगैरे तेथील कामगारांची एकेक लहान कमिटी बनविण्यांत यावी. तिनें सर्व कामगार सारख्याच दर्जाचे मानावे. वरिष्ठ यंत्रज्ञापासून हमालापर्यंत सर्वांना सारखा दर्जा असावा. कमिटीनें कोणताही निर्णय एकंदर कामगारांच्या सल्लामसलतीनें ठरवावा. कमिटीवरील सभासद नेमणें व काढून टाकणें याची पूर्ण व अमर्याद सत्ता कामगारांस असावी. या कमिटीनें

कारखाना कसा चालतो याचें संकलित ज्ञान प्रत्येकास द्यावें. कामगार-संघटनांचा हेतु संप घडविणें व गाऱ्हाण्यांची दाद लावून घेणें एवढाच नसून कामगारांना पूर्ण स्वायत्ततेनें कारखाना चालविण्यास शिकविणें हें कामगार-संघटनांचें ध्येय आहे. अराज्यवादी क्रांति होतांच त्या त्या कारखान्यांतील कामगारांनीं अखिल समाजाचे विश्वस्त या नात्यानें कारखाना पूर्णपणें स्वयंप्रेरणेनें चालवावयाचा आहे आणि त्यासाठीं अवश्य असणारी बौद्धिक व सांस्कृतिक पात्रता कामगारांचे अंगीं आणणें हें कामगार-संघटनांचें ध्येय आहे हें या कमिट्यांनीं ओळखलें पाहिजे. कारखाने चालविण्याची पात्रता व त्याबद्दलचा आत्मविश्वास कामगारांचे ठिकाणीं जसजसा अधिकाधिक येऊं लागेल तितक्या अधिक प्रमाणांत भांडवलदारांची आपण करतों ती गुलामगिरी अनावश्यक आहे अशी कामगारांची खात्री होऊन तो अराज्यवादी क्रांतीस उत्सुक होईल. तसेंच, क्रांति झाल्यावर बेबंदशाही माजण्याचा धोकाही यामुळें समूळ नाहींसा होईल.

कारखान्यांतील या कमिट्यांचे कामीं कारखान्यांतील शास्त्रज्ञ व यंत्रज्ञ यांचें सहकार्य मिळविणें अतिशय अगत्याचें आहे. कारखाना चालविण्याचीं सर्व अंगें व बिंगें यांनाच अवगत असतात. कारखाना चालविण्याचें ज्ञान यांच्याच साह्यानें कामगारांना मिळूं शकेल. क्रांतीचे वेळीं व नंतर कामगार स्वायत्ततेनें कारखाना चालवितील, त्या वेळींहि या यंत्रज्ञांच्या, फार काय पण हिशेबनिसांच्या साहाय्यावांचूनही कारखाना चालणें शक्य नाहीं. क्रांति याचा अर्थ कारखाने, खाणी वगैरे धनोत्पादन-साधनांवरील खाजगी मालकी रद्द करून ते सार्वजनिक मालकींत आणणें एवढाच. बाकी सर्व कारखाने, सर्व खाणी पूर्ववत् वाकबगारीनें, इतकेंच नव्हे तर अधिक वाकबगारीनें चालणार आहेत व चालल्या पाहिजेत. म्हणून यंत्रज्ञ व शास्त्रज्ञ

यांचें मन क्रांतीस अनुकूल करून घेण्याची अतिशय खटपट केली पाहिजे. सामान्य कामगार व यंत्रज्ञ यांचेमध्यें जितका एकोपा व जितकी खेळीमेळी निर्माण होईल तितकी ही गोष्ट अधिक शक्य होईल. सामान्य कामगारांप्रमाणेंच या 'वरिष्ठ' कामगारांवरहि सद्यःस्थितींत जुलूम होतच असतो. बेकारीच्या व नोकरीच्या अनिश्चितीच्या रोगानें या वर्गासहि पछाडलें आहेच. म्हणून शांततेनें, स्नेहानें, बुद्धिवादानें व प्रत्यक्ष संघटनाकार्यानें या वर्गाचें मन वळविण्याची खटपट केल्यास त्यांत अपयश येणार नाहीं.

## क्रांतीची आंखणी

केवळ धनोत्पादन-साधनें सार्वजनिक मालकीचीं केल्यानें क्रांतीचें कार्य संपत नाहीं तर पुन्हा सार्वजनिक व्यवहार सुरळीतपणें चालू करणें ही गोष्ट क्रांतीच्या दृष्टीनें महत्त्वाची आहे हें मागें सांगितलेंच. या मुद्द्यावर जितका जोर द्यावा तितका थोडाच होणार आहे. कारण क्रांतीचा उत्साह जनतेच्या अंगीं येतो तेव्हां तो अनावर होतो आणि उलटतो व ओसरतो तेव्हां तो तसाच अकस्मात् ओसरतो. क्रांतीपासून जनतेचें भौतिक जीवन सुधारतें आहे, सुधारणार आहे, क्रांतीपूर्वीची अवस्था पुन्हा परत येणें अनर्थकारक आहे, अशी लोकांची अनुभवानें खात्री पटेल तरच क्रांति टिकून राहील. म्हणून कामगारांनीं बुद्धिमान कामगारांच्या संस्था स्थापून ताबडतोब देशांत एकंदर कोणता माल किती आहे, उत्पादनाचीं साधनें आपणांजवळ कोणकोणतीं आहेत त्यांचें सामर्थ्य किती, यांचें आकडेवार टांचण केलें पाहिजे. आणि कांहींही कमी पडूं देण्यांत येणार नाहीं अशी ज़नतेची खात्री पटविली पाहिजे. हें माहिती जमविण्याचें काम वाटतें इतकें कठीण नाहीं. कारखाने, खाणी, गिरण्या यांतील कामगार-कमिट्यांनीं

कामगारांची या कामासाठीं आगाऊ तयारी करून ठेवलेली असल्यास वाकबगार कामगार झटाझट सर्व देशांतील परिस्थितीची मोजदाद करूं शकतील. खरा वेळ लागणार आहे तो या कमिट्यांनीं कामगारांची बौद्धिक व कर्तृत्वविषयक तयारी करण्यास लागणार आहे. ही तयारी म्हणजेच क्रांतीची तयारी होय. या कामीं नसत्या घाईचा कांहीं उपयोग नाहीं. "तान्ह्या बालकाचा जन्म जसा अकस्मात् होत नसतो तसाच नव्या समाजाचा जन्महीं अकस्मात होत नसतो. मातेच्या गर्भांत नवीन बालकाची जशी हळूहळू वाढ होत असते, त्याचप्रमाणें जुन्या समाजव्यवस्थेच्या पोटीं नव्या समाजव्यवस्थेची वाढ होत असते. बालकाला पूर्ण सजीव शरीर प्राप्त होण्यास ज्याप्रमाणें गर्भांत विशिष्ट मुदतीपर्यंत राहवें लागतें, कांहीं ठराविक पद्धतींनींच त्याचा विकास होत जाऊन व तें पूर्णता पावत असतें, तसेंच नव्या समाजव्यवस्थेचेंही आहे. मूल जन्मण्याची वेळ आली म्हणजे मातेला शारीरिक व मानसिक यातना होतात त्याप्रमाणें नव्या समाजव्यवस्थेच्या जन्मकाळींही जुन्या समाजव्यवस्थेस यातना व दुःख होत असतें." जितक्या प्रमाणांत गर्भाचें पोषण चांगल्या प्रकारें झालें असेल तितक्या प्रमाणांत मातेच्या यातना कमी होऊन बालक सुदृढ निपजतें. त्याचप्रमाणें क्रांतीची पूर्वतयारी जितकी चांगली झाली असेल तितक्या प्रमाणांत क्रांतिकालीं अत्याचार कमी होऊन नवी समाजव्यवस्था सुखानें जन्म पावते व सुरळीत चालू होते. क्रांतीच्या काळीं जनतेच्या कर्तृत्वास विलक्षण भरती येत असते. हें सर्व कर्तृत्व व्यवस्थित वापरून क्रांति यशस्वी करावयाची असते. हें नेतृत्वाचें काम करण्यास कामगार वर्गाची पात्रता जितकी झाली असेल तितकीच क्रांति यशस्वी होईल.

---

### श्रमाची सक्ती नको

क्रांतिकालीं व तदनंतरच्या कालीं होणाऱ्या समाज व्यवस्थेच्या स्वरूपासंबंधानेंही कांहीं स्थूल कल्पना अराज्यवाद्यांनीं मांडलेल्या आहेत. क्रांतीनंतर श्रमाची सक्ती करणें अथवा श्रमासाठीं लालूच लावणें अनावश्यक आहे, इतकेंच नव्हे तर तें घातुक होय, असें अराज्यवाद्यांचें म्हणणें आहे. त्यांच्या मतें परस्पर-सहकार्याची जाणीव समाजांत जी झाली असेल त्यावरच क्रांतीची सर्व भिस्त ठेवणें सुरक्षित होय. क्रांतीनंतर योग्य धनाची सर्व समाजास वाटणी करणें हें काम अत्यंत महत्त्वाचें व जोखमीचें आहे. समाजास धनाचा पुरवठा भरपूर होत राहणें ही गोष्ट या वेळीं महत्त्वाची असते व म्हणून जो गुणांत व परिमाणांत उत्पादन अधिक करील त्यास भोग्य धनाचा वाटा अधिक द्यावा, श्रम न करणारास मुळींच धन देऊं नये अथवा थोडें द्यावें असें ठरविण्याचा 'मोह' क्रांतीच्या पुढाऱ्यांना अनावर होतो. पण अराज्यवाद्यांना हें पसंत नाहीं. भोग्य धनाचा वाटा सर्वांस सारखा म्हणजे ज्याला जेवढा हवा तेवढा, कोणतीही अट न घालतां अथवा पक्षपात न करतां, दिला पाहिजे असा अराज्यवाद्यांचा आग्रह आहे. एकदां अशा पक्षपातास सुरुवात झाली कीं, लोकांना आपली फसवणूक झाली असें वाटूं लागतें आणि स्वातंत्र्य व समता यांचा अभाव निर्माण होऊं लागतो. धनाची वाटणी करतांना गांव-कमिट्या, पेठ-कमिट्या, गल्ली-कमिट्या वगैरे स्थापून भोग्य-धनाची समभाग वाटणी करीत जावें. धन पुरेसें नसलेंच तर सर्वांचाच वाटा यथाप्रमाण कमी होईल. राज्यहीन

समाजांत पैसा असावा कीं नाहीं हा प्रश्न बराच वादग्रस्त आहे. पण ती बाब धनाची वाटणी व विनिमय सोइस्करपणें कसा करतां येईल यासंबंधींच्या तपशिलाची आहे. पण सर्वांस सारखी म्हणजे ज्याच्या त्याच्या गरजेप्रमाणें भोग्य-धनाची वाटणी झाली पाहिजे या मुद्द्यावर बहुतेक अराज्यवाद्यांचें एकमत आहे.

ज्याला धन कमी मिळेल अथवा मुळींच मिळणार नाहीं तो चोरी करील. आणि या चोरीचें नियंत्रण करण्यासाठीं होईल तो खर्च आळशी लोकांना पोसण्याच्या खर्चाहून केव्हांही अधिक येईल. शिवाय तेवढ्याचेंच निमित्त करून राज्यसंस्था जन्म पावेल हा धोका अराज्यवाद्यांना मोठा वाटतो. त्यापेक्षां धनोत्पादनाची भिस्त जनतेच्या स्वेच्छ सहकार्यावर ठेवावी हें अराज्यवाद्यांना अधिक सुरक्षित वाटतें. त्यांच्या मतें श्रम करणें अथवा न करणें हें ज्याच्या त्याच्या इच्छेवर सोपविल्यास चुकार माणसांवर पाळत ठेवण्याचा खर्च व दगदग वांचेल, इतकेंच नव्हे तर, नैतिक वातावरणच असें उत्पन्न होईल कीं, आपल्या स्नेह्या-सोबत्यांकडून व समाजाकडून भलेपणा मिळावा म्हणून जो तो ईर्षेनें व उत्सुकतेनें श्रम करूं लागेल.

शिवाय समाजाची उन्नति ही समाजांतील व्यक्तींच्या ध्येयनिष्ठेवर अवलंबून असतें. कोणताही समाज—राज्यसत्तेच्या सक्तीवर आधारलेला समाजही——समाजांतील व्यक्तीच्या ठिकाणीं उच्चध्येयवाद बाणला गेल्यावांचून टिकूं शकणार नाहीं. केवळ पोटाची खळगी भरण्यासाठीं नव्हे, तर सृष्टींत जें कांहीं उदात्त आणि सुंदर आहे त्याबद्दल, आध्यामिक व सांस्कृतिक दृष्टचा जें जें श्रेष्ठ आहे त्याबद्दल आपल्या अंतःकरणांत एक सुप्त भूक असते ती जागृत करणें, तो ध्येयवाद जनतेपुढें ठेवणें हें कोणत्याही समाजजीवनास अत्यवश्य आहे. थोडक्यांत म्हणजे माणसांच्या अंगभूत असणाऱ्या सामाजिक

भावना जें जागृत करील, इतरांबद्दल स्वभावतः वाटणारी सहानुभूति व सामुदायिक जीवनाबद्दलचें प्रेम ज्यानें उत्पन्न होईल, स्वातंत्र्य, न्याय यांबद्दल ज्यामुळें प्रेम वाटूं लागेल, आणि अगदीं सामान्य माणसासमुद्धां महापूर, धरणीकंप यांसारख्या एकाद्या सार्वजनिक अनर्थाच्या प्रसंगीं दिसून येणारी विचाराची व आचाराची उदात्तता त्याच्या अंगीं कायमची बाणेल असा ध्येयवाद व्यक्तिमात्रापुढें ठेवला पाहिजे.

असा ध्येयवाद असला तर श्रम करण्याच्या सक्तीची जरूरी नाहीं, आणि तो नसेल तर केवढ्याही व कसल्याही सक्तीनें परस्पर-सहकार्याची भावना जागृत होणार नाहीं.

## उत्पादनांतील व्यवस्थितपणा

अशा प्रकारें उत्पादक श्रम करणें हें ज्याच्या त्याच्या इच्छेवरच सोपविलें तरी उत्पादनाची व्यवस्था व शिस्त म्हणून कांहीं तरी लावावीच लागेल. क्रांति ही संपापासून सुरू होणार असल्यानें प्रथम उत्पादन कमी होणें व धनाचा तुटवडा पडणें हे परिणाम जनतेस भोगावे लागतील. पण असा काळ फार थोडा असेल. नेहमींचा संप व हा क्रांतिकारक संप यांत मोठा फरक हा राहणार आहे, कीं एरव्हींच्या संपांत कामगार कारखाना सोडून निघून जातात, पण क्रांतिकारक अशा सार्वत्रिक संपांत कामगार हे कारखाने, खाणी वगैरे उत्पादनसाधनांवरून मालक-वर्गास हुसकून लावून तीं ते स्वतांच्या ताब्यांत घेतील व लगेच त्यांचा वापर सार्वजनिक हितासाठीं सुरू करतील. यामुळें धनोत्पादन फार काळ खुंटून राहणार नाहीं. क्रांती-नंतर धनोत्पादनाचा वेग फारच वाढवावा लागेल. कारण आजवर लक्षावधि माणसें जीं दारिद्र्यांत खितपत पडलीं होतीं त्या सर्वांना भरपूर अन्न, वस्त्र, आश्रय, शिक्षण व सुखसोयी यांचा लाभ करून

देणें हें क्रांतीचें कर्तव्य आहे. पण अनेक प्रकारें उत्पादन-वाढीस परिस्थिति अधिक अनुकूल होत जाईल. क्रांतीनें आणलेला उत्साह व स्वातंत्र्याचें आणि बंधुभावाचें वातावरण यांनीं लोकांना कर्तृत्वाचा हुरूप येईल. शिवाय उत्पादनाचा व्यवहार किती तरी सुकर होईल. भांडवलशाहींत चढाओढीमुळें होणारी उधळ-माधळ, एकमेकांची पीछेहाट करण्यासाठीं उत्पादनांत राखण्यांत येणारा गुप्तपणा आणि दुसऱ्याच्या गुप्त युक्त्या शोधून काढण्यासाठीं करावी लागणारी हेरगिरी, इन्कम्‌टॅक्स अधिकाऱ्यांना, भागीदारांना, कामगारांना आणि गिऱ्हाइकांना फसविण्यासाठीं ठेवावे लागणारे अनेक प्रकारचे खोटे हिशेब, उणाख माल गिऱ्हाइकाचे गळ्यांत बांधण्यासाठीं उभारलेला विक्रीचा अवजड पसारा, खोटी जाहिरातबाजी वगैरे सर्व बाबतींत उत्पादनाच्या किती तरी अधिकपट श्रम जे वायां जातात, ते क्रांतीनंतर जरूर नसल्यानें बंद होतील. शिवाय सैन्य, आरमार वगैरे संरक्षण-दलावर जीं माणसें व जे श्रम आज खर्च होत आहेत ते सर्व उत्पादनाच्या कामीं लावतां येण्यासारखे आहेत. शास्त्रें व यंत्रें यासंबंधींच्या नवीन नवीन शोधांनीं माणसांचा उत्पादनाचा वेग अतिशय वाढला आहे. आज केवळ नफेबाजीसाठीं उत्पादन होत असल्यानें या सर्व शोधांचा पूर्ण उपयोगही होत नाहीं. पण क्रांतीनंतर माणसाला गरज असेल तेवढें सर्व धन निर्माण करावयाचें असें ठरलें म्हणजे या सर्व शोधांचा उपयोग होऊन गुणांत व परिमाणांत उत्पादन श्रेष्ठ होत जाईल. माणसाच्या सर्व गरजा भागविण्यासाठीं शास्त्रज्ञ व त्यांचे शोध हे कल्पतरूप्रमाणें माणसापुढें आज उभे असतां आणि कर्तृत्वाच्या उत्साहानें भारलेली मानवजात श्रम करण्यास उत्सुक असता भोग्य धनाचा तुटवडा मानवजातीस पडेल अशी भीति बाळगण्याचें मुळींच कारण नाहीं.

या धनोत्पादनाच्या श्रमांत विशिष्ट अनुक्रम पत्करावा लागेल. आज लक्षावधि जनतेला आवश्यक वस्तूंचा तुटवडा पडत असतां चैनीच्या आणि व्यसनाच्या वस्तूंची निर्मिति अमर्याद प्रमाणांत होत आहे. खरोखर हीच बेबंदशाही होय. क्रांतीनंतर प्रथम सर्वांना पोट-भर अन्न, अंगभर वस्त्र आणि निवाऱ्याची व एकांताला योग्य अशी राहण्याची जागा यांचा पुरवठा करण्याकडे सर्व श्रम खर्च होतील. नंतर सोईच्या, संस्कृतिविकासाच्या व शेवटीं चैनीच्या वस्तूंचें उत्पादन होईल. दुष्ट व्यसनांच्या व अनीतीच्या वस्तूंचें उत्पादन होणारही नाहीं अथवा या बाबतींत वैद्य लोकांना ज़रूर वाटेल त्याप्रमाणें उत्पादन होईल. पण चैनीच्या, विलासाच्या वस्तु निर्माण करण्यास कांहींच हरकत नाहीं. अनीति अथवा व्यसन यांचा फैलाव न होतां व आवश्यक वस्तूंचा पुरवठा सर्वांना झाल्यानंतर कोणास चैनीच्या वस्तु हव्या असतील त्यांना समाजानें त्या पुरवणें यांत कांहींच गैर नाहीं.

## प्रादेशिक स्वयंपूर्णत्व

उत्पादनाचीं साधनें अफाट वाढलीं असल्यानें लहान लहान प्रदेशांत प्रचंड देशांच्या गरजा भागविण्याइतकें धन उत्पन्न होऊं शकेल. एकटें लँकाशायर जगाला कापड पुरवील, एकटें ब्राझिल जगाला धान्य व कॉफी पुरवील ही कल्पना अशक्य नाहीं; पण अराज्यवाद्यांना हें नापसंत वाटतें. उत्पादनाचें एवढें प्रचंड केन्द्री-करण हें स्वातंत्र्यास व मानवी कर्तृत्वास हानिकारक आहे असें त्यांचें मत आहे. त्याऐवजीं लहान लहान एकट भूप्रदेश सर्व बाजूंनीं स्वयंपूर्ण करणें व त्यासाठीं केन्द्रीभूत उत्पादनाचें विलग न करणें हें अराज्यवाद्यांना हवें आहे. इंग्लंड हें जगाला कापड पुरवितें व यंत्रें पुरवतें, पण अन्नद्रव्यें व कच्चा माल याबाबत इंग्लंड परावलंबी आहे.

हें इंग्लंडचें परावलंबन थांबवलें पाहिजे. शेतींत शास्त्रीय सुधारणा केली व उद्योगधंद्यांत आज खर्च होणारें भांडवल व श्रम शेतीचे उत्पादनाचे कामीं खर्च केलें तर इंग्लंड शेतमालाचे बाबतींत स्वावलंबी होईल ही गोष्ट पुष्कळ शास्त्रज्ञांनीं मान्य केली आहे. याच दृष्टीनें हिंदुस्थानसारख्या अफाट देशांतले भिन्नभिन्न प्रांत सर्व बाजूंनीं शक्यतों स्वावलंबी करणें शक्य होईल. या धोरणानें जगांत जागोजाग चालू असलेले घरगुती धंदे मोडून न टाकतां त्यांची सुधारणा करून त्यांचें लहान स्वरूप कायम ठेवणेंही चांगलें.

प्रादेशिक स्वावलंबनाच्या या मुद्दयाचें महत्त्व क्रांति टिकविण्याच्या दृष्टीनें विशेष आहे. जगाचें उत्पादन केंद्रीभूत झालें तर क्रांति ही सगळ्या जगभर एकदम करावी लागेल. क्रांति ही जगभर झाली तरच ती टिकाऊ ठरेल हें खरें. पण सगळ्या जगभर एकदम क्रांति व्हावी म्हणून वाट पाहायचें ठरलें तर कदाचित् ती कधींच होणार नाहीं. लहानें क्षेत्रांत, एकाद्या राष्ट्रांतच क्रांतीची सुरुवात प्रथम होणें शक्य आहे. पण तेथें ती यशस्वी झाली तरी तिचा इतर जगांत फैलाव होऊं नये यासाठीं या क्रांतीवर बाहेरून हल्ला होऊं शकेल. अशा वेळीं क्रांति झालेला देश आर्थिक दृष्टया स्वावलंबी नसेल तर त्याची कुचंबणा व कोंडमारा करून क्रांतीचा विध्वंस करणें परराष्ट्रांना सहज शक्य होईल; यासाठीं भौगोलिक दृष्टया अथवा सांस्कृतिक दृष्टया एकट असणाऱ्या राष्ट्रांनीं आर्थिक बाबींत पूर्ण स्वावलंबी होण्यानें क्रांति चिरंजीव होण्यास मदत होणार आहे. अर्थात् परराष्ट्रांतून पाठोपाठ क्रांतीच्या लाटा न उठतील तर कोणत्याही एका देशांतली क्रांति कायम टिकून राहील हें शक्य नाहीं.

## परचक्र आलें तर ?

क्रांतीवर परचक्र आलें अथवा अंतर्गत बंडाळी माजली तर

क्रांतीचें संरक्षण कसें करावयाचें, हा प्रश्न आक्षेपकास सर्वांत अधिक महत्त्वाचा वाटतो. अराज्यवादी क्रांति शस्त्रसंन्यासावर आधारली असल्यानें या शंकेचें महत्त्व विशेष आहेच. जरूर तर शस्त्रास्त्रांचा उपयोग करूनही क्रांतीचें संरक्षण केलें पाहिजे असें अराज्यवाद्यांचें या शंकेस उत्तर आहे.

येथवरच्या विवेचनांत 'क्रांति' आणि 'राज्यहीन समाजस्थिति' हे शब्द केव्हां केव्हां समानार्थी वापरले आहेत, ते बऱ्याच अंशानें खरेंच आहे. पण वरील विशिष्ट प्रश्नाचें उत्तर समजण्यासाठीं या दोन शब्दांतील सूक्ष्म फरक लक्षांत घेतला पाहिजे. क्रांति होतांच राज्यहीन परिस्थिति निर्माण केली ज़ाईल व ती केली पाहिजे हें खरेंच; तथापि ही परिस्थिति निर्माण होण्यास कांहीं काळ जाणारच. या काळास 'राज्यहीन परिस्थितीचा काल' असें न संबोधता 'क्रांति-काल' असें संबोधावें लागेल. 'अराज्य' समाजांत पूर्ण स्वातंत्र्य व पूर्ण शांतता नांदेल. त्याची तयारी या क्रांतीनें होणार आहे. ही अराज्य परिस्थिति क्रांतिकालांतून, रात्रींतून उषःकाल व उषःकालांतून सूर्योदय होतो त्याप्रमाणें, हळूहळू उदय पावेल. अर्थात् क्रांतिकालांत पूर्ण शस्त्र-संन्यास करणें शक्य होणार नाहीं; पण क्रांतिकारकांनीं शस्त्रास्त्रांचा केलेला उपयोग हा आजच्या राज्यकर्त्यांनीं केलेल्या उपयोगाहून खास वेगळ्या प्रकारचा असल्याचें दिसून येईल. पहिली गोष्ट ही कीं क्रांतीचें परचक्रापासून संरक्षण करण्यासाठीं जनता अगदीं स्वेच्छेनें पुढें येईल. कोणत्याही प्रकारची सक्तीची लष्करभरती, लालूच, लांच-लुचपत, धाकदपटशा यांची गरज लागणार नाहीं. क्रांतिरक्षणासाठीं गिरणींत यंत्र चालविणें आणि रणांगणावर तोफ चालविणें या दोन्ही कामांत सर्वजण सारखाच उत्साह दाखवितील. रशियन राज्यक्रांतीचें रक्षण रशियन शेतकरी-कामकऱ्यांनीं असेंच अतिशय उत्साहानें

केलें. युद्ध म्हटलें कीं शिस्त, हुकुमत या गोष्टी अवश्य होतातच. व्यक्तिस्वातंत्र्यावर त्यामुळें नियंत्रण येणारच. पण क्रांतिसंरक्षणास उद्युक्त झालेली शेतकरी-कामकरी जनता हें नियंत्रण स्वखुषीनेंच स्वीकारील. "जनता ही आज राजे, भांडवलदार यांचेसाठीं लढते व रणांगणावर मरते. क्रांतीवर एकदां जनतेची श्रद्धा बसूं द्या, कीं तीसाठीं अधिक उत्साहानें जनता प्राणार्पण करील. रशियांतील क्रांतिविरोधी सेनापति युडेनिच यांच्या शस्त्रास्त्रसन्नद्ध सैन्याविरुद्ध रशियांतील निःशस्त्र आणि अर्धपोटी बायकामुलांनीं घनघोर संग्राम केला व क्रांतीचें रक्षण केलें. तसेंच तन, मन, धन अर्पून जनता क्रांतीचें रक्षण करील." या क्रांतीवर जनतेची श्रद्धा बसली पाहिजे. हीच श्रद्धा हेंच क्रांतीचें सामर्थ्य होय.

## विरोधकाशीं क्रांतिकारकांचें धोरण

परचक्राचा हल्ला परतविणें एवढेंच क्रांतिकारकांचें कार्य. तेवढें साधण्यापुरता शस्त्रप्रयोग केला तरी क्रांतिकारक सैन्य परराष्ट्रावर सूड उगविण्याचा प्रयत्न करणार नाहीं; परराष्ट्राचे सैनिक कैद करून त्यांची कत्तल अथवा त्यांचा छळ करणार नाहीं. माणसें ओलीस ठेवून घेऊन त्यांचा शिरच्छेद करणार नाहीं, हें धोरण या क्रांतिवादी सैन्याचें वैशिष्ट्य असेल. परचक्राशीं लढतांना ज्याप्रमाणें कमींत कमी शस्त्रप्रयोग करावा लागेल त्याप्रमाणें अंतर्गत क्रांति-विरोध दडपून टाकण्यासाठींही शस्त्रप्रयोग करावाच लागेल. अशा शस्त्रप्रयोगांत जे क्रांतिविरोधक प्राणास मुकतील तें त्याचें व क्रांति-कारकांचेंही अपरिहार्य दुर्दैव होय. तें पत्करण्यावांचून इलाज नाहीं. पण यापरता क्रांतिविरोधकांचा छळ अथवा जाच क्रांतिकारकां-कडून मुळींच होणार नाहीं. क्रांतिकारक सैनिक अंतःकरणाचे दयाळु

व सहानुभूतिपूर्ण असले पाहिजेत व असतील. " क्रांतिविरोधकांचा छळ न करतां अथवा त्यांना पाशवी क्रौर्यानें न वागवितां त्यांचा विरोध नाहींसा करण्याचे नवे उपाय क्रांतिकारकांनीं शोधले पाहिजेत. जुनी पद्धत त्यांना तुरुंगांत टाकण्याची, त्यांना आळसांत बसविण्याची व त्यांजवर पहारा करण्याची आहे. यामुळें क्रांतिविरोधक तुरुंगांत राहतो व पाशवी क्रौर्य सहन करीत राहतो तोंवर त्याचा क्रांति-विद्वेष तीव्रतर होत जातो. सूड आणि त्यासाठीं गुप्त कट यांचे विचार त्याच्या डोक्यांत घोळत असतात. क्रांतीच्या दृष्टीनें हे उपाय मूर्ख-पणाचे व अपायकारकच होत. याऐवजीं पराभूत क्रांतिविरोधकांस आपली चूक कळून यावी व विरोध व्यर्थ आहे हें त्यांस पटावें असे उपाय क्रांतिकारक वापरतील. क्रांतिविरोधकांना स्वातंत्र्य देण्यांत येईल. त्यांना शिक्षा करण्यापेक्षां ज्ञान देणें, परिस्थिति समजावून सांगून त्यांचें मन वळविणें, हे उपाय क्रांतिकारकांना अधिक इष्ट वाटतील."

पण या विरोधकांच्या वृत्तींत फरक न पडला तर त्यांचा विरोध निरुपद्रवी करण्यास आणखीही इतर अनेक उपाय आहेत. ते अव-लंबण्यांत येतील. क्रांतिविरोधकांची पांगापांग करून त्यांना दूर-दूरच्या जिल्ह्यांत ठेवण्यांत येईल. तेथें त्यांना तुरुंगांत न ठेवतां स्वतंत्र ठेवून इतर सर्वांप्रमाणें त्यांना धनोपभोग घेऊं दिला जाईल. सामाजिक श्रमकार्यांत त्यांस सामील करून घेतलें जाईल आणि सर्व प्रकारच्या सुखदुःखांत त्यांना समाजाकडून वाटेकरी केलें जाईल. यामुळें त्यांचा विरोध आपोआप मावळून क्रांतिप्रेम त्यांच्या ठिकाणीं हळूहळू रुजूं लागेल असा अराज्यवाद्यांना विश्वास वाटतो. लोक अशा क्रांति विरोधकांवर एकदम विश्वास टाकणार नाहींत, त्यांची नीट कसोटी पाहतील हें खरेंच. पण स्नेहाचें, प्रेमाचें, समजुतीचें, सहानुभूतीचें, सहिष्णुतेचें, सहकार्याचें वातावरण हें केवढ्याही

विकृत स्वभावास सुरळीत करण्यास समर्थ आहे अशी क्रांतिकारकांची मनुष्यस्वभावाबद्दल दृढ श्रद्धा आहे. इतक्याउपरही जे अगदीं गणंग राहतील अशा क्रांति-विरोधकांची स्वतंत्र वसाहत करून व्यक्ति-स्वातंत्र्याचा भंग ते न करतील अशा प्रकारें त्यांना आपला जीवनक्रम चालवूं देण्यांत येईल.

क्रांतिकाळांत व नंतरही मतप्रसाराच्या बाबतींत पूर्ण स्वातंत्र्य देण्यांत येईल. "ज्याला जें हवें तें त्याला बोलूं द्यावें. त्याच्या मतप्रसारास नियंत्रण घातलें कीं, त्याचा छळ झाला असें लोकांना वाटूं लागून लोकांत त्याचेबद्दल सहानुभूति उत्पन्न होते. भाषण व मुद्रण यांवर दडपण घालणें हा केवळ स्वातंत्र्यावरच आघात नव्हे तर तें क्रांतीच्या मुळावरच घाव घालण्यासारखें आहे. त्यामुळें असंतोष, तेढ, तुरुंग, गुप्त पोलीस व यादवी यांचाच निवडुंग माजेल. भीति, अविश्वास, गुप्त कट यांनीं वातावरण कुंद होऊन त्यांत क्रांति घुसमटून मरेल. क्रांतीचें रक्षण करणें इष्ट तर खरेंच; पण मतप्रसारानें क्रांतीवर संकट येतें असें मानण्याचें मुळींच कारण नाहीं. टीकेनें दुखावली जाईल इतकी क्रांति दुबळी असतांच उपयोगी नाहीं. उलट रास्त टीकेनें क्रांतीचें बळ वाढलें पाहिजे व ती निर्दोष होत गेली पाहिजे. क्रांति-विरोधी कृत्यें दडपलींच पाहिजेत. पण नुसत्या मतप्रसारास शस्त्राघाताची जरूरीच नाहीं. क्रांतिविरोधी कृत्यें दडपतांना सुद्धां एका व्यक्तीच्या कृत्याबद्दल त्याच्या वर्गास अथवा कुटुंबियांस उपद्रव दिला जाणार नाहीं. बापाच्या पापाबद्दल मुलास जबाबदार धरलें जाणार नाहीं."

सारांश, अराज्यवाद हा पूर्ण स्वातंत्र्याचा मार्ग आहे. व्यक्ति-स्वातंत्र्य हाच त्याचा आधार आहे. "कोणत्याहि क्रांतीनें आजवर हा स्वातंत्र्याचा मार्ग चोखाळलाच नाहीं. कोणीही या मार्गावर

आजवर पुरेशी श्रद्धाच ठेविली नाहीं. आजवरच्या सर्व क्रांत्यांत पाशवी शक्ति, दडपशाही, छळ, सूड, दहशत यांचाच उपयोग झाला. आतां नव्या पद्धति, नवे उपाय हातीं घेण्याची वेळ आली आहे. पण स्वातंत्र्याच्या साधनानें समाजक्रांति घडवून आणून मनुष्यमात्राची गुलामगिरींतून सुटका करावयाची आहे. पण व्यक्तिस्वातंत्र्यावर आमचा विश्वास नसेल तर क्रांतीचा आपल्या हातून विश्वासघात होईल, म्हणून व्यक्तिस्वातंत्र्याच्या तत्त्वावर क्रांतीची उभारणी करण्याचें धैर्य आपण दाखविलें पाहिजे. आपल्या विचारांत व कृतींत स्वातंत्र्य अवतरूं द्या, म्हणजे त्यानेंच आपलें बल वाढेल. केवळ या स्वातंत्र्यानेंच क्रांति परिणामकारक व कल्याणकारक होईल. स्वातंत्र्यानेंच सांस्कृतिक उन्नतीचा मार्ग आपल्या हातीं येऊन कल्याण व आनंद यांचा लाभ सर्वांना करून देणारी समाजव्यवस्था निर्माण होईल. आणि त्याच वेळीं राज्यसंस्थारूपी अंधःकाराचें आवरण पूर्ण नाहींसें होऊन स्वातंत्र्याच्या उदार आणि खुल्या सूर्यप्रकाशांत विकास पावण्याची जगाच्या इतिहासांत ही पहिली खरी संधि माणसाला मिळेल.

---

## समारोप : : : ८

अराज्यवादाची विचारसरणी जगांत आजवर फारच थोड्या लोकांस पटली आहे हें मागें सांगितलेंच आहे. आजच्या जगांत सत्तीवर आधारलेल्या राज्यसंस्थेचा बडेजाव सर्वत्र गाइला जात आहे. फॅसिस्ट व कम्युनिस्ट या परस्परविरुद्ध विचारसरणी

जगांत अतिशय प्रभावी असून सक्ती म्हणजे व्यक्तिस्वातंत्र्याचा व लोकशाहीचा पूर्ण अभाव यांवरच त्या आधारलेल्या आहेत. अशा जगांत पूर्ण व्यक्तिस्वातंत्र्यावर व शांततेवर आधारलेल्या राज्यहीन स्थितीच्या व्यवहार्यतेबद्दल कोणासही खात्री पटविणें अतिशय कठीण आहे. व्यक्तिस्वातंत्र्याचा जास्तींत जास्त पुरस्कार यापूर्वी अराज्यवाद्यांखेरीज इंग्लंड, अमेरिका व फ्रान्स या देशांतील लोकशाहीच्या पुरस्कर्त्यांनीं केला. फ्रेंच राज्यक्रांतींत 'स्वातंत्र्य, समता व बंधुभाव' हीच मुख्य घोषणा होती. रूसो, व्हॉल्टेर, मॉंटेस्क हे लोकशाहीचे फ्रेंच तत्त्वज्ञ फ्रेंच क्रांतीचे निर्माते म्हणून इतिहासांत प्रसिद्ध आहेत. अमेरिकन स्वातंत्र्यवीर, मुत्सद्दी व तत्त्वज्ञ जेफर्सन हा पूर्ण व्यक्तिस्वातंत्र्यवादी होता. इंग्लंडांत बेंथम, मिल् व स्पेन्सर हे प्रख्यात व्यक्तिस्वातंत्र्यवादी एकोणिसाव्या शतकांत होऊन गेले. या सर्वांना राज्यसंस्था ही जुलमी संस्थाच वाटे. पण समाजांत शांतता, सुव्यवस्था व न्यायदान झालें नाहीं आणि त्यासाठीं राज्यसंस्थेकडून व्यक्तिस्वातंत्र्यावर येणारें थोडेंसें नियंत्रण स्वीकारलें नाहीं तर हें व्यक्तिस्वातंत्र्य समाजांतील दुष्ट, गुन्हेगार, मूर्ख, वेडे असे लोक हिरावून घेतील आणि समाजांत बेबंदशाही माजेल अशी भीति वरील सर्व लोकशाहीच्या पुरस्कर्त्यांना वाटे व म्हणून ते राज्यसंस्थेचें आस्तित्व अपरिहार्य मानीत. पण राज्यसंस्थेचें अधिकारक्षेत्र अगदीं संकुचित असावें, केवळ पोलिस, न्यायकोर्ट आणि लष्कर-आरमार यापलीकडे राज्यकर्त्यांनीं कोणतेंही खातें चालवूं नये व यासाठीं कमींत कमी कर घ्यावा असें हे तत्त्वज्ञ प्रतिपादीत. पण याच लोकशाहीबरोबर जी भांडवलशाही निर्माण झाली तिनें व्यक्तिस्वातंत्र्य कसें नष्ट केलें हें आपण मागें पाहिलेंच आहे. या भांडवलशाहीचें रक्षण राज्यसंस्था करते म्हणून राज्यसंस्था व भांडवलशाही दोन्हीही नाहींशीं करावीं

म्हणजे मगच व्यक्तिस्वातंत्र्य निर्माण होईल असें अराज्यवादी प्रतिपादीत आहेत.

अराज्यवादाच्या विचारसरणीवर अव्यवहार्यतेचा जो आक्षेप घेण्यांत येतो तो आजवर प्रत्येक नव्या तत्त्वज्ञानावर आलाच आहे. विल्बरफोर्स गुलामगिरीच्या नाशाचा पुरस्कार करीत असतां, गुलाम स्वतंत्र झाले म्हणजे जगांतलें उत्पादन खुंटून अनर्थ होईल असें विल्बरफोर्सविरुद्ध प्रतिपादण्यांत येई. अमेरिकेंत गुलामगिरीचा नाश झाल्यानंतर स्वतंत्र झालेल्या गुलामांना स्वातंत्र्याचें जीवन अवजड जबाबदारीचें वाटून गुलामगिरी होती तीच बरी होती असें ते म्हणूं लागले अशीही आख्यायिका आहे. भांडवलशाहीच्या आरंभीं जगाच्या बाजारासाठीं कोणता माल व तो किती निर्मावा, जगाची मागणी कोणती हें आपणास कळेल कसें, अशा शंका भांडवलशाहीच्या व्यवहार्यतेवर घेतल्या जात. राजाशिवाय केवळ पार्लमेंटाच्या बारभाईनें राज्यें कशीं चालतील असे आक्षेप लोकशाहीविरुद्ध घेतले जात. आणि शेतकऱ्यांची व कामकऱ्यांची म्हणजेच अडाण्यांची राज्यसत्ता कशी नांदूं शकेल असा अव्यवहार्यतेचा आक्षेप कम्युनिस्टांविरुद्धही घेतला जाई. केवढ्याही पांडित्ययुक्त युक्तिवादानें त्या त्या वेळीं आक्षेपकांचें समाधान झालें नाहीं. इतकेंच नाहीं तर आक्षेपकांनीं बहुतेक नव्या तत्त्वांना शस्त्रास्त्रांनीं विरोधही केला. पण आज वरील तत्त्वांविरुद्ध पूर्वीं आलेले आक्षेप प्रत्यक्ष व्यवहारानें बऱ्याच प्रमाणांत नाहींसे झाले असून लोकांना त्यांच्या व्यवहार्यतेची खात्री पटली आहे. प्रत्यक्ष अनुभवानंतर पूर्वीं न सुचलेले नवेच आक्षेप या समाज-तत्त्वांसंबंधानें आले आहेत हें खरें. अशा कांहीं आक्षेपांमुळेंच अराज्यवादाच्या समर्थनास बळकटी आली आहे. त्याप्रमाणें अराज्यवादाचा प्रत्यक्ष अवतार झाल्यावर आज न सुचणारे असे कांहीं नवे आक्षेप त्या वेळीं दिसूं लागतील

व त्याचा विचार त्या वेळीं करावा लागेलच. पण उलट आज अराज्य-वादाविरुद्ध येणाऱ्या अव्यवहार्यतेच्या आक्षेपांचा निरास अराज्य-वादाचा प्रत्यक्ष अवतार झाल्यावर पुष्कळ अंशांनीं होण्याचा संभव आहे असें इतिहासावरून निःसंशय म्हणतां येतें.

याच श्रद्धेनें फ्रेंच तत्त्वज्ञ प्रुधाँ, रशियन क्रांतिकारक मिकेल बकुनिन, रशियन शांतिवादी व साहित्यिक टॉलस्टॉय, रशियन शास्त्रज्ञ व प्रसिद्ध क्रांतिकारक पीटर क्रोपॉटकिन वगैरे अराज्यवाद्यांनीं आपलीं सर्व आयुष्यें स्वार्थत्याग करून व नाना तऱ्हेचे हालकष्ट सोसून या तत्त्वाच्या प्रसारार्थ वेचिलीं. मिकेल बकुनिन याच्या आयुष्याचीं बहुतेक वर्षें निरनिराळ्या युरोपियन राष्ट्रांच्या तुरुंगांतच गेलीं. अजूनही या तत्त्वास फारसा पाठिंबा मिळत नाहीं, इतकेंच नव्हे तर महायुद्धोत्तर काळांत हा पाठिंबा कमी होत आहे. पण या तत्त्वाच्या सेवेस वाहून घेतलेलीं कांहीं थोडीं माणसें साऱ्या जग-भर असून त्यांचे अहोरात्र यत्न सुरू आहेत.

माझ्या मतें हिंदुस्थानांत गांधी जी चळवळ करीत आहेत तिचें ध्येय गांधींनीं अराज्यवादाचेंच ठरविलें असावें. निदान त्यांची चळवळ त्याच दिशेनें चालली आहे असें मला दिसतें, मग गांधींना तें मान्य असो अथवा नसो. मागें अराज्यवादाचें जें विस्तृत विवरण आलें आहे तें गांधींच्या विचारसरणीशीं बरेंच जुळणारें आहे. 'श्रेष्ठ ध्येयाचीं साधनें श्रेष्ठच असलीं पाहिजेत', 'सैन्यबळानें नव्हे तर जास्तींत जास्त शांततेच्या मार्गानें क्रांति केली पाहिजे', 'व्यक्ति-स्वातंत्र्यावरच समाजरचना आधारली पाहिजे', 'शत्रूसही प्रेमानेंच वागविलें पाहिजे' वगैरे अनेक अराज्यवादी मतें हीं गांधींच्या मताशीं तंतोतंत जुळणारीं आहेत. जगांत अराज्यवादाचा प्रसार चळवळी-च्या रूपानें कोठें किती चालला आहे हें फारसें प्रसिद्ध नाहीं. पण

गांधी हे या अराज्यवादी विचारसरणीकडेच हिंदुस्थानला व जगाला खेचण्याच्या धोरणानें हिंदी राजकारण चालवीत आहेत असें पुष्कळदा सूक्ष्मपणें पाहतांना वाटतें. एरवीं गूढ वाटणाऱ्या गांधींच्या किती तरी वर्तनांचा उलगडा याच विचारसरणीनें होतो असें माझें मत झालें आहे. हें सिद्ध करायचें तर त्यास येथें अवकाश नाहीं. पण 'आपणावर बेतलेलें भावि महायुद्ध होऊन गेलें म्हणजे मग जगांतील लोकांना निःशस्त्र प्रतिकाराचा मार्ग पटूं लागेल' असें गांधींनीं जें कांहीं दिवसांपूर्वीं विधान केलें आहे त्यांत या अराज्यवादाचेंच बीज आहे. गांधी हे शास्त्रज्ञाप्रमाणें प्रमाणबद्ध न बोलतां नुसत्या व्यवहारी माणसाप्रमाणें प्राप्त परिस्थितीकडे पाहून अंतःस्फूर्तीनें बोलतात व लिहितात. यामुळें ते निश्चितपणें अराज्य-वादाकडेच जगास खेचूं पाहत आहेत हें फारसें कोणाच्या लक्षांत येत नाहीं. आणि दुसरी गोष्ट म्हणजे गांधींच्या चळवळीचें हें मर्म त्यांच्या कित्येक कट्टया अनुयायांनाही समजलेलें नाहीं व दुसऱ्या कांहीं अनुयायांना अराज्यवाद अथवा लोकशाहीही मान्य नसून लोकोत्तर पुढाऱ्याची सत्ता म्हणजे एक प्रकारची फॅसिस्टशाही हवी आहे. यामुळें गांधींना खरे अराज्यवादी अनुयायी मिळालेले नाहींत व त्यांच्या चळवळीवर अराज्यवादाचा छाप ठळकसा दिसत नाहीं. यामुळेंच गांधींना याबाबत नजीकच्या भविष्यकाळांत यश येण्याची-ही बिलकुल आशा नाहीं. पण केवळ एकट्याच्या प्रभावी कर्तृत्वानें गांधींनीं जगांतील कोणाही अराज्यवाद्यापेक्षां अराज्यवादाची बाजू पुढें रेटली आहे याबद्दल कोणाही हिंदी माणसास थोडासा अभिमान वाटला तर तें स्वाभाविक होय.

प्राचीन हिंदूंना राज्यहीन समाजाची कल्पना माहीत होती असें दिसतें.

"नैव राज्यं न राजाऽसीत् । न दण्डो नच दण्डिकः ॥
स्वधर्मेण प्रजास्तावत् । रक्षन्ति स्म परस्परं ॥ १ ॥*

अशा अर्थाचें अतिप्राचीन आर्यांच्या वस्तीचें एक वर्णन महाभारताच्या शांतिपर्वांत आहे. पण पुढें ही अराज्य परिस्थिति टिकली नाहीं. मात्स्य न्याय माजला तेव्हां प्रजेनें मनूस 'राजा हो' अशी विनंति केली. पण 'मला अपराध्यास शासन करावें लागून माझ्या हातून पाप घडेल' म्हणून राजपद घेण्यास मनू कां कूं करूं लागला. तेव्हां 'आम्ही तुला आमचें पुण्य अर्पण करतों असें प्रजेनें त्यास सांगितलें व मनूनें राजपद धारण केलें' अशी भारतांत कथा आहे. प्रसिद्ध स्मृतिकार मनू हा 'जबरदस्त राज्यसंस्थेवांचून समाज टिकूंच शकत नाहीं' असें म्हणतो. कदाचित् भारतांतली वरलि कथा ही अराज्यवादाची अव्यवहार्यता सांगण्यासाठींच आलेली असेल; पण अतिप्राचीन हिंदूंत या मताचा पुरस्कार करणारा एखादा पंथ असावा असें यावरून वाटतें.

हा पंथ व्यवहार्य किती आहे हें ठरविणें इतिहासाचें काम आहे. पण समाजव्यवस्थेच्या इतर कोणत्याही विचारसरणीपेक्षां ही विचारसरणी अधिक उदात्त, अधिक हृदयस्पर्शी, अधिक माणुसकीची व मनुष्यस्वभाव आणि मनुष्यसमाज यांचा मूलग्राही विचार करायला लावणारी आहे यांत शंका नाहीं.

---

* तेव्हां राज्य नव्हतें व राजाही नव्हता. दण्ड अथवा दण्डधारी कोणीही नव्हता. प्रजा स्वधर्मानें चालून परस्परांचें रक्षण करी.